


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ५६ । अंक १ । ऑक्टोबर २००१

२० व्या शतकातील मराठी उपयोजित समीक्षा

जयप्रकाश नारायण
काही संस्मरणे

संपूर्ण क्रांतीच्या अन्वेषणपद्धतीची समस्या

तुकारामांच्या अभंगवाणीची अवतरणक्षमता

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५५ । अंक १ । ऑक्टोबर २००१
अधिक अश्विन – चैत्र अश्विन, शके १९२३
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संचालक व संपादक सहमत असतीलच, असे नाही.

## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
सरोजा भाटे

**संपादक :**
वसंत पळशीकर

**साहाय्यक संपादक :**
अ.र. कुलकर्णी, एस्.डी. इनामदार,
अ.ना. ठाकूर, यशवंत सुमंत

**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाचा मंडळाच्या "नियतकालिकांचा स्थायी निधी" योजनेत समावेश केला असला तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

या नियतकालिकाचा समावेश मंडळाच्या "नियतकालिकांचा स्थायी निधी", योजनेत करण्यात आलेला असून या नियतकालिकाच्या स्थायी निधीवर मिळणाऱ्या व्याजाच्या रकमेचा विनियोग या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ येणारा खर्च भागविण्यासाठी करण्यात येतो.







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

## अ नु क्र म




मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन



अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# 'अपूर्ण क्रांती'च्या अन्वेषणपद्धतीची समस्या

**शरद् पाटील**

१९९९ साली प्रसिद्ध झालेल्या डॉ. रा.भा. पाटणकरांच्या *अपूर्ण क्रांतीने*[१] भारतातील कम्युनिस्ट, समाजवादी, आंबेडकरवादी व भांडवलदारी लोकशाहीवादी पक्षांसमोर ते विसरू पाहात असलेली अपूर्ण क्रांतीची समस्या निर्णायकपणे उभी केलेली आहे. या क्रांतीला या पक्षांनी वेगवेगळी नावे दिली आहेत. मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाने जनतेची लोकशाही क्रांती, भारतीय कम्युनिस्ट पक्षाने राष्ट्रीय लोकशाही क्रांती व नक्षलवादी पक्षगटांनी नवी लोकशाही क्रांती. डॉ. बी.आर. आंबेडकरांनी त्यांचे *हू वेअर दी शूद्राज* (१९४६) हे पुस्तक जोतिबा फुल्यांना अर्पण करताना म्हटले आहे – 'आधुनिक भारताच्या सर्वश्रेष्ठ शूद्रास ज्याने हिंदूंमधील हीनवर्गीयांना उच्चवर्गीयांच्या दास्याची जाणीव करून दिली आणि परकीय सत्तेपासून स्वातंत्र्यापेक्षा सामाजिक समता जास्त श्रेयस्कर असल्याचे सांगणाऱ्या महामंत्राचा उपदेश केला.[२] यावरून ते राष्ट्रीय स्वातंत्र्यापेक्षा सामाजिक स्वातंत्र्याला – समाज-क्रांतीच्या परिभाषेत जातिव्यवस्थान्तक भांडवलदारी लोकशाही क्रांतीला – जास्त महत्त्व देत होते हे स्पष्ट होते. पण, कायदेमंत्री झाल्यानंतर, स्वतः बनवलेल्या घटनेखातर त्यांना या समाज-क्रांतीवर पाठ फिरवावी लागली. समाजवादी हे लोकशाही समाजवादी असल्याने त्यांनी ही क्रांती करायचा प्रश्नच उद्भवत नाही. भांडवलदारी लोकशाहीवादी पक्ष हे संसदीयवादी असल्याने त्यांच्याही बाबतीत अशा क्रांतीचा प्रश्न येत नाही. शेतकरी संघटनेची महिला आघाडी स्त्रीवाद (feminism) मान्य करीत असली आणि स्वतः शरद जोशी जातिविरोधी बोलत असले, तरी त्यांचा जात्यंतक कृषिक्रांतीला विरोध आहे. भारतात स्त्रीवादी गट असले, तरी ते अजून या समाजक्रांतीचा विचार करण्यापर्यंत आलेले नाहीत.

पाटणकर हे स्वतः उदारमतवादी भांडवलदारी विचारवंत आहेत हे त्यांनी, भारताची समाजक्रांती पश्चिमेप्रमाणे भांडवलदारी लोकशाही क्रांती न केल्याने अपुरी राहिलेली आहे, या सूत्राचा या पुस्तकात वारंवार पुरस्कार केलेला आहे यावरून स्पष्ट होते.[३] त्यांच्या या पुरस्कारामुळे त्यांना उदारमतवादी म्हणणे कितपत संयुक्तिक होईल याबद्दल शंका आहे. त्यांच्या या पुस्तकाची अन्वेषणपद्धत (methodology) मार्क्सवादी असल्याचे त्यांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केल्याने या शंकेला पुष्टी मिळते.

"या चर्चेत मार्क्सवाद्यांच्या मूलाधार–अधिरचना (base-superstructure) या सैद्धांतिक प्रतिमानाचा खूप उपयोग होण्यासारखा आहे आणि तसा उपयोग आपण करणार आहोत..."[४]

"आपल्या अभ्यासात मात्र आर्थिक पार्श्वभूमीला आपण पुष्कळ महत्त्व दिले आहे. आर्थिक दृष्टिकोणातून घटना/घटिते यांचा अभ्यास केल्यास एक वेगळी मर्मदृष्टी मिळते असा मार्क्सवाद्यांचा दावा आहे; आणि त्यात काही प्रमाणात निश्चित तथ्य आहे....[५]

"सर्व मार्क्सवादी तत्त्वचिंतक समाजातील आर्थिक घडामोडींना फार महत्त्व देतात. त्यांना व आर्थिक रचनेला ते समाजाचा मूलाधार (base) मानतात. या आर्थिक मूलाधाराशी संवादी अशी समाजाची अधिरचना (superstructure) असते. मूलाधारात होणाऱ्या बदलांबरोबर अधिरचनेतही – म्हणजे, सामाजिक, राजकीय संस्था, धार्मिक विचार-आचार, तत्त्वज्ञानात्मक व्यूह इत्यादींमध्येही – बदल होतात. आर्थिक मूलाधाराविषयी बोलताना मार्क्सवादी उत्पादनाची साधने (means of production) आणि उत्पादन-संबंध (relations of production) यांवर आपले लक्ष केंद्रित करतात...."[६]

पायामध्ये पाटणकरांनी उत्पादनशक्तींचा (forces of production) समावेश केलेला नाही ही मोठी उणीव आहे. उत्पादनशक्तींमध्ये आज अधिकाधिक महत्त्व प्राप्त करीत असलेल्या पर्यावरणाचाही समावेश होतो हे लक्षात घेतले

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

पाहिजे. अन्वेषणात एवढी कळीची क्षमता प्राप्त केलेल्या या पद्धतीचे सूतोवाच मार्क्सने *ए कॉन्ट्रिब्यूशन टु द क्रिटिक ऑफ पोलिटिकल एकॉनॉमी* (१८५९) मध्ये केलेले आहे.[७] प्रभाकर पाध्येंनी त्यांच्या *मानव आणि मार्क्स* मध्ये केलेले भाषांतर सर्वात सुगम असल्याने ते खाली देत आहे –

"आपल्या जीवनासाठी आवश्यक असलेल्या सामाजिक उत्पादनात माणसे परस्परांशी निश्चित स्वरूपाचे संबंध प्रस्थापित करतात. हे संबंध अत्यावश्यक असतात. त्याचप्रमाणे ते त्यांच्या इच्छा-अनिच्छांच्या पलीकडचे असतात. ते उत्पादन-संबंध त्यांच्या भौतिक उत्पादनशक्तीच्या विशिष्ट अवस्थेशी जुळणारे असतात. या उत्पादनसंबंधांची गोळाबेरीज म्हणजे समाजाची आर्थिक रचना — जी समाजाच्या राजकीय आणि कायदेविषयक इमारतीचा पाया असते, आणि तिच्याशी सामाजिक जाणिवेची निश्चित रूपे (forms) जुळणारी असतात. माणसांच्या भौतिक जीवनाची उत्पादनपद्धती त्यांच्या सर्वसाधारण सामाजिक, राजकीय आणि बौद्धिक जीवन-प्रक्रियेची परिस्थिती (condition) निर्माण करीत असते. माणसांची जाणीव त्यांचे जीवन ठरवीत (determine) नाही, तर उलट त्यांचे सामाजिक असतेपण त्यांची जाणीव ठरविते (determine). समाजाच्या उत्पादनशक्ती, त्यांच्या विकासाच्या एका विशिष्ट अवस्थेत, विद्यमान उत्पादनसंबंधांशी संघर्ष पावतात किंवा हीच गोष्ट कायदेशीर भाषेत मांडायची असेल तर ज्या स्वामित्व-संबंधांच्या चौकटीत या शक्ती अद्यापपर्यंत आपले कार्य करीत होत्या त्या स्वामित्व-संबंधांशी त्यांचा संघर्ष निर्माण होतो. जे संबंध आतापर्यंत उत्पादनशक्तीच्या विकासाची साहाय्यक रूपे होते ते आता याच विकासाच्या पायबेड्या ठरतात. मग सामाजिक क्रांतीचा कालखंड सुरू होतो. आर्थिक पायातील बदलाबरोबर त्याच्यावरील अवघी अमर्याद इमारत कमीअधिक वेगाने परिवर्तन पावते..."[८]

मार्क्सची ही अन्वेषणपद्धत त्याच्या ऐतिहासिक भौतिकवाद या व्यवहारित (applied) तत्त्वज्ञानाची आहे, आणि हे व्यवहारित तत्त्वज्ञान त्याचे अनित्यात्मक भौतिकवाद हे वैश्विक तत्त्वज्ञान मानवसमाजाला लावण्यातून तयार झाले आहे. मार्क्सने येथे consciousness (जाणीव) हा जो शब्द वापरलेला आहे त्याकडे पोथीनिष्ठेपायी मार्क्सवाद्यांनी लक्ष दिले नाही हे समजण्यासारखे आहे. पण, पांटणकरां-सारख्या थोर भांडवलदारी लोकशाहीवादी दार्शनिक पंडिताचेही लक्ष गेले नाही हे आश्चर्यकारक आहे. सिग्मण्ड फ्राइडच्या (१८५६-१९३९) नेणिवेचा (subconscious) शोध मार्क्सवादी त्यांच्या एकप्रवाही अन्वेषणपद्धतीमुळे लक्षात घेणे शक्य नव्हते, तरी ब्रिटिश मार्क्सवादी दार्शनिक ख्रिस्तोफर कॉडवेलने त्याची प्रभावी मांडणी करून मानवी जाणिवेपलीकडील विश्व नेणिवेत जमा केले आहे. कॉडवेलचे योगदान मी *जाति-व्यवस्थाक सामंती सेवकत्व* या माझ्या ग्रंथात (१९९६) मांडले आहे[९] आणि अशोक जोशींनी त्यांच्या *कॉडवेलचा कलाविचार* (१९८९) मध्ये विवरण केले आहे. पण, मानवी मेंदूचा जाणीव-नेणीवयुक्त व्यापार मानण्यावर हे थांबत नव्हते. प्रमाणशास्त्रच वेगळे होत होते. तत्त्वज्ञानाचे स्वतंत्रपण वेगळ्या प्रमाणशास्त्रावर, म्हणजे ज्ञान मिळवायच्या वेगळ्या साधनांवर, अवलंबून असल्याने जाणीव-नेणीवयुक्त प्रमाण-शास्त्राचे तत्त्वज्ञान प्रतिबिंबवादी प्रमाणशास्त्राच्या मार्क्सवादी तत्त्वज्ञानाच्या चौकटीत राहातच नव्हते. ते स्वतंत्र तत्त्वज्ञान होत होते. कम्युनिस्ट चळवळीला, जिचे नेतृत्व सोव्हिएत युनियनकडे होते, हे मंजूर होणे शक्य नव्हते. स्पॅनिश यादवी युद्धातून कॉडवेल जगला असता, तरी हे पाखंड करणे त्या स्टालिनशाहीच्या जमान्यात त्याला शक्य नव्हते. *दास-शूद्रांची गुलामगिरी* लिहायचे पाखंड मी जरी पारंपरिक कम्युनिस्ट चळवळीत असतानाच (१९७२) केले होते, तरी माकपच्या *सोशल सायंटिस्ट* या नियतकालिकाने त्याचे सीरियलायझेशन ५व्या प्रकरणापासूनच थांबवले होते.

अन्वेषणपद्धतीचे डिपार्चर मी *दासशूद्रांची गुलामगिरी* मध्येच घेतल्याचे पुढीलप्रमाणे प्रथम सूचित केलेले आहे "हे दोन्ही प्रवाह, अब्राह्मणी व ब्राह्मणी, सबंध भारतीय इतिहासभर जोडीने वाहात गेले आहेत, झगडत, परस्परांवर प्रभाव पाडीत व विधायक नकारक्रिया करीत (sublating)."[१०] 'सूचित' हा शब्द मी मुद्दाम वापरला आहे. कारण हा ग्रंथ लिहिताना माझ्या जाणिवेत एकप्रवाही वर्गवादी ऐतिहासिक भौतिकवाद होता, तर नेणिवेत बहुप्रवाही ऐतिहासिक भौतिकवाद. ब्रिटिशपूर्व भारतीय समाजात वर्ग या संस्थेचा उदयच झालेला नसल्याने जरी त्याला मार्क्सच्या अन्वेषणपद्धतीतला वर्गवाद लागू पडत नव्हता, तरी वर्गवादाच्या रूपातील (form) ऐतिहासिक भौतिकवादाचा आशय (content) लागू पडत होता. हा आशय म्हणजे अभ्यासाधीन समाजाच्या वस्तुनिष्ठ संशोधनाची पद्धत होती. संशोधनाचा आरंभ व शेवट

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

अधिरचनेच्या अभ्यासाने करणारी पद्धत चैतन्यवादी (idealist) असते. भौतिकवादी संशोधनाभ्यास पायाने प्रारंभ करायचा, नंतर अधिरचनेचा आणि मग दोन्ही संशोधनाभ्यासांचा संयोग करून त्या समाजाचे गतीचे नियम शोधून काढायचे. हा आशय कोणत्याही समाजाच्या संशोधनाभ्यासाला लागू पडतो — आजच्या जातिवर्ग समाजाला, जातिवर्गपूर्व जातिसमाजाला, जातिपूर्व वर्णसमाजाला इ.इ. **संशोधनाभ्यासाधीन समाजाच्या गतीचे नियम त्याच्या वस्तुनिष्ठ संशोधनाभ्यासातूनच निघाले पाहिजेत, त्याच्यावर एकप्रवाही वर्गवादी अन्वेषणपद्धत लादून नाही.**

संशोधनाभ्यासाला कोणतेही 'मॉडेल' निर्णायकतः चालत नाही. देवीप्रसाद चट्टोपाध्यायांनी श्री.अ. डांगेंप्रमाणे मॉर्गन-एंगल्सप्रोक्त प्रिमिटिव्ह कम्युनिझमचे मॉडेल घेऊन भारतीय गणसमाजाचे विवरण करायचा प्रयत्न केला. पहिली गोष्ट म्हणजे, प्राथमिक तौलनिक संशोधनाभ्यासासाठी मॉडेल आवश्यक असले, तरी ते वास्तविक असले पाहिजे, कपोलकल्पित नको. मॉरिस ब्लॉकने त्याच्या *मार्क्सिझम अँड अँथ्रॉपॉलॉजी* (१९८३) मध्ये सिद्ध केले आहे, की मॉर्गनने *एन्शन्ट सोसायटी*चा (१८७७) समारोप ज्या 'स्वातंत्र्य, समता, बंधुता' अधिष्ठित प्रिमिटिव्ह कम्युनिझमने केला त्याची मार्क्स व एंगल्स यांना गरज — 'र्‍हेटॉरिक' म्हणून – होती, त्याला त्यांनी वास्तवतेची कसोटी लावली नाही आणि ॲन्थ्रॉपॉलॉजीच्या (प्राग्मानव-वंशशास्त्र) दृष्टीने तो सत्य ठरू शकत नव्हता. मागासलेली उत्पादनसाधने सोडली, तर तो समाज समता व बंधुता, म्हणजे लोकशाहीच्या दृष्टीनेही परिपूर्ण होता ही संकल्पना मार्क्स व एंगल्स यांच्यावरील हेगेलीय चैतन्यवादाचा अवशिष्ट प्रभाव दाखवते, आणि डायलेक्टिक्सला (अनित्यतावाद) ते कदापि मंजूर होऊ शकत नाही. अशा लोकशाही ब्रह्म्याला सोव्हिएत युनियनच्या शास्त्या कम्युनिस्टांनी सत्य मानल्यामुळे आणि स्तालिनने सर्वहारा क्रांतीकडून भांडवलदार लोकशाही नष्ट होऊन सर्वहारा लोकशाही आल्याची घोषणा केल्यामुळे" जी आली ती बोल्शेव्हिकांची व, अंतिमतः त्यांच्या शास्त्या टोळक्याची, हुकूमशाही आली. **समाजवादी लोकशाही, पुन्हा, अशी बाहेरून लादून येत नाही, तर ऐतिहासिक समाजविकासाच्या आकलनातून व समाजातून यावी लागते.** ऐतिहासिक समाजविकासाचे आकलन म्हणजे काय याची मीमांसा पुढे येईल. पण एवढ्याही विवरणाने हे स्पष्ट व्हावे की, इतिहास मरत नसतो. चुकीच्या आकलनातून तो प्रेरक न बनता बाधक होतो.

कपोलकल्पित समाजाच्या मॉडेलचे सत्यस्वरूप समजल्यानंतर ते नाकारले जाऊ शकते. पण, आध्यात्मिक समतेसाठी जीवने समर्पित करणाऱ्या भक्तिपंथाच्या संतांनी कर्ममार्गी चातुर्वर्ण्य हा परमेश्वर कृष्णाने निर्मिला म्हणून तो स्वीकारला असे एका बाजूला दिसते, तर दुसऱ्या बाजूला मार्क्सवादी इतिहासज्ञही वर्णव्यवस्था चार वर्णांनीच बनलेली होती असे गृहीत धरताना दिसतात. वास्तविक वर्णधर्माचे एकप्रवाही नित्यात्मक मॉडेल बनवले गेलेले येथे आपणाला दिसते. मी *दासशूद्रांची गुलामगिरी* मध्ये सप्रमाण दाखवले आहे की, कृषिमायेची द्वैवर्ण्यव्यवस्था (क्षत्र व सत्वन) वैराज्य-स्त्रीराज्यांनी सिंधुसंस्कृतीतच बनवली होती. तिचे पर्यवसान आर्यागमनाआधीच मातृवंशक त्रैवर्ण्य (क्षत्रिय, ब्राह्मण व दास) राजकांत झाले होते आणि तीं आर्यांची पितृसत्ताक चातुर्वर्ण्य (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र) राजकांशी समांतरपणे चालत राहिली; मग त्यांच्या शवांवर उदयाला आलेले पुरुषसत्ताक द्वैवर्ण्य (क्षत्रिय व दासकर्मकर) अराजक संघगण बुद्धकाळापासून उतरती कळा लागून गुप्तकाळापर्यंत तगून राहिले. ब्राह्मणी छावणीचा शिरोमणी कृष्ण हा संघगणव्यवस्थेचा उद्गाता होता आणि त्याच्या यादव संघगणात ब्राह्मण वर्णच नव्हता हे अजून लक्षात घेतले जात नाही. **प्रत्येक वस्तू अनन्य असते या दिग्नागाच्या अपोहवादानुसार[२] अनित्यतावादाचे क्षेत्र प्रत्येक वस्तूनुसार वेगळे बनते! यावरून वस्तुनिष्ठ संशोधनाभ्यासाला सर्वसाधारणीकरण (generalisation) किती बाधक असते हे लक्षात यावे.**

मार्क्सवादी इतिहासज्ञांनी जातिव्यवस्था ही अधिरचनात्मकच मानल्यामुळे त्यांनी तिचा वेगळी उत्पादनव्यवस्था म्हणून वर्गापेक्षा वेगळा असा संशोधनाभ्यास केला नाही, तर आंबेडकरांनी जरी तिला वेगळी उत्पादनव्यवस्था मानली तरी, बंद वर्गांच्या जाती बनल्या, या त्यांच्या अनैतिहासिक अभ्युपगमामुळे जातिव्यवस्था जन्मापासूनच प्रतिगामी बनली. आनुवंशिकता, जन्मसिद्ध व्यवसाय, सजातीय बेटी-व्यवहार, जातीत रोटीव्यवहार, गावाच्या सवर्णनिहाय व अवर्णनिहाय वस्त्या व जातपंचायत ही तिची सहा लक्षणे त्यांनी तिच्या जन्मापासूनच अस्तित्वात आल्याचे मानल्यामुळे ती जन्मतःच जखखड व जालिम थेरडी ठरली! बुद्ध हा भारताचा महत्तम








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

क्रांतिकारी होता या *द बुद्ध अँड हिज धम्म*मधील त्यांच्या विधानाने समाजक्रांती समाजाचे उत्पादन अनेक पटींनी वाढवत असते या सर्व समाजक्रांत्यांच्या योगदानाकडे दुर्लक्ष केले. त्यांची अन्वेषणपद्धत फुलेंप्रमाणे नकारात्मक अब्राह्मणी असल्यामुळे ती जातिव्यवस्थेचा समाजविकासक्रमात अनित्यतावादी संशोधनाभ्यास करायला असमर्थ ठरली.

जातिव्यवस्थेच्या क्रमबद्ध असमानतेमुळे (graded inequality) ब्राह्मणवादाविरोधी क्रांती झालीच नाही असे सरसकट विधान आंबेडकर करतात.[१३] पहिली गोष्ट म्हणजे, समाजक्रांती विचारसरणीविरुद्ध होत नसते. ती अवरोधक बनलेल्या समाजाविरुद्ध होत असते. जातींच्या उतरंडीमुळे ब्राह्मणवादाचा पराभव कधी झाला नाही या अर्थी हे विधान घेतले, तर बुद्ध व संघप्रणीत वर्णव्यवस्थाक दासप्रथान्ताच्या समाजक्रांतीमुळे ब्राह्मणवादाचा सापेक्ष पराभव झाला नाही, असा अपरिहार्य निष्कर्ष निघतो. पूर्वमीमांसा या ब्राह्मणी तत्त्वज्ञानाचा महत्तम आचार्य कुमारिलभट्ट (८वे शतक) त्याच्या *तंत्रवार्तिक*मध्ये सांगतो, की बहुसंख्य शूद्र हे बौद्धोपासक आहेत.[१४] ब्राह्मणी छावणीने प्रतिचढाई जरी २ऱ्या शतकापासूनच सुरू केलेली असली, तरी जातिव्यवस्था अवरुद्ध होईपर्यंत ती अब्राह्मणी छावणीवर निर्णायक मात करू शकलेली नाही. म्हणजे, **ब्राह्मणवादाच्या वाटचालीचा मागोवा जातिव्यवस्थेच्या वाटचालीच्या आधारावरच घेतला जाऊ शकतो.**

जातिव्यवस्थेचा **विकास** व्हायच्या या १२०० (इसवीपूर्व ६०० ते इसवी ८००) वर्षांत जातिसंघर्ष कसा प्रखर होत गेला याचे साक्षात चित्र आपल्याला शूद्रकाच्या 'मृद+शकटिक' (*मृच्छकटिक*) या २ऱ्या शतकातील संस्कृत नाटकात दिसते. गिरीश कर्नाडांनी त्यांच्या 'उत्सव' या चित्रपटात या जातिसंघर्षाचा मागमूसही राहू न दिल्याने त्याच्या प्रतिवादासाठी मी 'मृच्छकटिकाचा उत्सव' हा लेख जुलै ८६च्या *नवभारत*मध्ये लिहिला.[१५] या नाटकात ब्राह्मण सार्थवाह श्रेष्ठी चारुदत्त गणिका वसंतसेनेशी लग्न करतो, तर ब्राह्मण शर्विलक हा सदनिका या वेश्येशी. वैदिकधर्मीय उज्जयिनीराज पालकाविरोधी शूद्र प्रजेने केलेल्या राज्यक्रांतीचे नेतृत्व शूद्र गोपालदारक (गोपालपुत्र) करतो आणि त्याला चारूदत्त व रेभिल या व्यापाऱ्यांचे पुग/श्रेणी, राजाचा चांभार सेनापती चंदनक व त्याचे जातभाई **सहभागी** असलेली श्रेणी, वसंतसेनाप्रणीत वेश्यालय, गृहदास, चारुदत्तासारख्यांना प्राणदंड देणारे अस्पृश्य चांडाल व पूर्वाश्रमीचा संवाहक असलेला बौद्ध भिक्षू व बौद्ध विहार, इ. मदत करतात. येथे समाजविद्रोहातील बौद्ध धर्माची पुढाकाराची भूमिका लक्षात घेतली गेली पाहिजे. २ऱ्या शतकापर्यंत जातिव्यघस्थेचे आनुवंशिकता एवढेच लक्षण अस्तित्वात आलेले आहे आणि वाकीची लक्षणे पूग व श्रेणी या जात्यातीत संस्थांनी रोखून धरलेली आहेत. या काळातल्या वाणिज्य व वित्त भांडवलदारांवर मी पुढे तौलनिकपणे लिहिणार आहे. येथे सूचकपणेच लिहीत आहे.

*मुद्राराक्षस* या संस्कृत नाटकाची कथा चंद्रगुप्त मौर्यकालीन (इसवीपूर्व ३ रे शतक) असली, तरी नाटककार विशाखदत्त हा ५व्या ते ९व्या शतकातला मानला जातो. चंद्रगुप्तासाठी चाणक्य 'वृषल' (शूद्र) शिवाय दुसरे संबोधन वापरत नाही आणि नंदाचा ब्राह्मण बौद्धोपासक अमात्य राक्षस चांडालस्पर्शाने विटाळल्याचे सांगतो...."भो, भो विष्णुगुप्त! न मां श्वपाकस्पर्शदूषितं स्पष्टुम् अर्हसि।"[१६] यांवरून विशाखदत्त ९व्या शतकाच्या सुमाराचा असावा (चारुदत्त चांडालस्पर्शाने विटाळत नाही). पाटलीपुत्राचा माजी नगरशेट चंदनदास हा राक्षसाचा अभिन्नहृदय मित्र दाखवलेला आहे आणि तो स्वतः बौद्ध उपासक आहे. पण, बुद्धकालीन मेंडकाप्रमाणे तो कस्सक-गहपति नाही, की चारुदत्तासारखा सार्थवाहपुत्र नाही. तो मणिकारश्रेष्ठी, जौहरी दाखवलेला आहे. पूग/श्रेणीचा अस्त झाल्याचा काहीही पुरावा नाटकात आढळत नसला, तरी अनुमान तेच निघते.

तुर्को-भारतीय सरंजामशाहीच्या काळात शेतीतंत्रात झालेल्या सुधारणांचा आढावा इर्फान हबीब यांनी *द पेझन्ट इन इंडियन हिस्टरी*मध्ये घेतला आहे; पण, त्यातून कृषिउत्पादनात झालेली वाढ संख्यात्मक होती. ९व्या शतकापर्यंत जातिव्यवस्थेचा कमाल विकास झालेला असल्यामुळे कृषिविकासात गुणात्मक वाढ होणे शक्य नव्हते. तुर्की सुलतान वा बादशहा कितीही उदारमतवादी असले, तरी त्यांच्या राज्यांतील उत्पादनव्यवस्था जातिसंबंधांनी निर्धारित होती आणि अमीरउमराव जरी प्रधान शासक असले तरी त्यांना शेतसारा व करांची वसुली शेतकरी जातींच्या व ब्राह्मणादी उच्चजातींच्या वतनदारांमार्फत करावी लागत असे आणि प्रशासनही. अबुल फझ्ल त्यामुळे *ऐन-इ-अकबरी*त जेव्हा अकबराचे चातुर्वर्ण्यसमर्थक धोरण मांडतो[१७], तेव्हा ते सर्वच मुसलमान सत्ताधीशांचे धोरण होते हे लक्षात घेतले पाहिजे. ख्रिश्चन धर्माप्रमाणे इस्लाम जातिविरोधात जन्मलेला नव्हता.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बुद्धकालापासूनच्या तुर्कपूर्व सामंत प्रथेतील सर्वच राजांनी जातिव्यवस्थेमार्फत शासन केले; पण, शशांकासारख्या (६ वे शतक) कडव्या ब्राह्मणी श्रौतस्मार्तधर्मसमर्थक राजांनी अब्राह्मणी धर्मांच्या उच्छेदाचे धोरण स्वीकारले, तर बाकीच्यांनी एकतर सर्वधर्मसमभावाचे वा अब्राह्मणी धर्मसमर्थनाचे. या निकषावर अशोकासारख्या राजांना अब्राह्मणी म्हणावे लागेल. म्हणून, अशोकाच्या उत्तरायुष्यात ब्राह्मण मंत्र्यांनी त्याचा नातू युवराज संपदि याला हाताशी धरून अशोकाचा छळ केला.[१८] काश्मीरचा राजा चक्रवर्मा याचा राज्यारूढ झाल्यानंतर एक वर्षातच (इ.स. ९३६-९३७) डामर सामंतांनी अमानुष खून करायचे कारण त्याने अस्पृश्या (लोंबी) हंसी इला राणी केले हे निमित्तमात्र होते.[१९] खरे कारण त्याने जातिविरोधी पाशुपत धर्माचा स्वीकार केला होता हे होते. सारावसुलीतील मोठा वाटा सरंजामदारांकडे राहात असे असे पाटणकर दाखवतात.[२०] शूद्र रयतेचे शोषणपीडन वाढवून आपला वाटा वाढवण्याकडे सरंजामदार व उच्चस्तरीय वतनदार यांची प्रवृत्ती असे. यातून ते ब्राह्मणी धर्माचे तरफदार बनत. यामुळेच संभाजीचा युवराज असतानाच ब्राह्मण मंत्र्यांशी संघर्ष आल्याचे वा.सी. बेंद्रे दाखवतात.[२१] पण, राजा झाल्यानंतर त्याचा उच्चस्तरीय मराठा वतनदारांशी संघर्ष केवळ वतनाच्या प्रश्नावरून आला नाही, ना केवळ ते रयतेचे शोषणपीडन करीत होते यावरून, तर तो करीत असलेल्या जात्यंतक शाक्त धर्माच्या प्रसारामुळे आला. याकडे संभाजीसमर्थक इतिहासज्ञांचेही अजून लक्ष गेलेले नाही. कमल गोखले त्यांच्या 'शिवपुत्र संभाजी'मध्ये लिहितात -

"संभाजी राजांचा छिन्नविच्छिन्न देह वढू, बुद्रकला फेकण्यात आला..."

'पेशवे दप्तरातील दि. १९-५-१७२३ च्या कागदाप्रमाणे, 'गोविंद गोपाळ ढगोजी मंगोजी हे तीर्थरूप राजश्री कैलासवासींचे वृंदावन मौजे वढू तर्फ पाबळच्या राणात आहे तेथे हे राहून वृंदावनांची सेवा करतात. याजनिमित्य स्वामी याणी कृपाळू होऊन मौजे वढू तर्फ पाबळ येथील खालसा पड जमीनपैकी अव्वल दुम सीमती प्रतीची जमीन बिघे कुलंब व कुलकानु इनाम दिली...."[२२]

माझ्या सूचनेवरून पुणे विद्यापीठाचे विद्यार्थी-विद्यार्थिनी मे २५ ला वढूला गेले आणि शोधाचे अहवालपत्र मला पाठवले आहे. आख्यायिकेनुसार वढूच्या महारांची ब्राह्मणांनी कत्तल केली होती. त्यामुळे गावकामासाठी महार शिल्लक राहिला नाही. एक महार बाई बाळंतपणासाठी भीमा-टाकळीला गेली असल्याने वाचली होती. तिला गावकऱ्यांनी गावावर आणले आणि तिच्या डोक्यावर पाण्याचा कच्चा घडा देऊन ती जेथून जेथपर्यंत चालली ती जमीन तिला दिली. गोविंद तिचा वंशज होता आणि (शाक्त) पीठाधिपती झाला होता. आज संभाजी व कवी कलश यांच्या समाध्या महारवाड्याशेजारी त्याच जमिनीत आहेत. यावरून स्पष्ट होते, की संभाजी पित्याच्या व्यक्तिगत धर्म स्वीकारापाशी थांबला नाही (तरीही त्याला विषप्रयोग झाला), तर त्याने शाक्त धर्माचा प्रसार केला, म्हणून ब्राह्मण व कायस्थ कारभारी आणि उच्चभ्रू मराठा वतनदार एकत्र आले आणि त्यांनी औरंगजेबाशी संगनमत करून संभाजीला पकडून दिले. भारतीय इतिहासातले जात्यंताप्रीत्यर्थ पितापुत्रांचे हे शेवटचे बंड होते.

आंबेडकरांनी जातिव्यवस्था ही बंद वर्गव्यवस्थेतून जन्माला आली असे गृहीत धरले असल्याने त्यांनी ब्राह्मणवाद-विरोधी बौद्धवाद हाच आद्य संघर्ष मानला. ब्रिटिशपूर्व भारतात वर्गव्यवस्था कपोलकल्पित असल्याने *त्या जातिपूर्व समाजात त्यांना संघर्ष सापडणे शक्य नव्हते.*

येथे म्हणून जास्त पुढचा, तत्त्वज्ञानात्मक प्रश्न उभा राहतो. दिग्नाग व धर्मकीर्ती यांनी अपोहवादानुसार अनन्य वस्तू व इतर अनन्य वस्तू यांच्यातला बहिर्गत विरोधच आद्य मानला. अनन्य वस्तू**मधील** विरोधाचा विचार केलेला दिसत नाही. तत्त्वज्ञानात ते विज्ञानवादी वा चैतन्यवादी असल्याने असे होणे अपरिहार्यही होते. पण **कोणत्याही अनन्य वस्तूत विरोध असतो हे आधुनिक विज्ञानाने सिद्ध केले आहे.** त्यामुळे तथाकथित आद्य वैदिक वर्णसमाजात विरोध असणे अपरिहार्य ठरते. नेमके तेच एक आद्य धर्मसूत्रकार हारीत याने प्रारंभिक बुद्धोत्तर (इसवीपूर्व ४थे शतक) नोंदवून ठेवले आहे. (त्याचे धर्मसूत्र अस्तित्वात नाही. त्यांची उद्धरणे धर्मशास्त्रात येतात.) एका उद्धरणात तो म्हणतो – '...श्रुतिप्रमाण को धर्मः। श्रुतिश् च द्विविधा, वैदिकी तान्त्रिकी च।'[२३] तंत्र या शब्दाचा उल्लेख वेदात् एकदाच येतो आणि त्याचा अर्थ होतो शेती याकडे चट्टोपाध्याय त्यांच्या *लोकायत* मध्ये आपले लक्ष वेधतात.[२४] आर्य पशुपालक असल्यामुळे शेती त्यांनी अनार्यांपासून घेतली हे मी **दासशूद्रांची गुलामगिरी** मध्ये सप्रमाण दाखवले आहे. वेद हे कृषिमायेच्या संहिता

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असल्याने वेदही त्यांनी पराभूत अनार्यांपासून घेऊन त्यावर पुरुषसत्ताक संस्कार केले आहेत. (त्यावर सविस्तर चर्चा प्रकरण २ मध्ये येईल.) म्हणून, अनार्यांची तांत्रिक श्रुती ही वैदिक श्रुतीच्या पूर्वीची होती हे लक्षात घेतले पाहिजे. (तांत्रिक श्रुतीतील विरोधाचा विचार आपण प्रकरण २ मध्ये करणार आहोत.) **या दोन श्रुतींमधील विरोध ब्राह्मणी वैदिक श्रुती व अब्राह्मणी तांत्रिक श्रुती यांमधला होता.** अब्राह्मणी प्रवाह नामशेष करायच्या ब्राह्मणांच्या प्रयत्नांवर चट्टोपाध्यायांसारख्या महापंडितांनी प्रकाश टाकलेला आहे. ब्राह्मणांच्या योगदानांकडे दुर्लक्ष न करताही त्यांच्या कर्मठ वृत्तीकडे पाटणकर खालीलप्रमाणे लक्ष वेधतात ते दुर्लक्षून चालणार नाही -

"श्री.म. माटे... (म्हणतात) : खर्ड्याच्या लढाईत शिदनाक महाराचे पथक होते. हा तासगावाकडील कळंबी गावचा वतनदार होता. शाहू सुटून इकडे आल्यावर त्याचा आजा त्यांच्या फार उपयोगी पडला म्हणून महाराजांनी त्याला हा गाव वतन दिला होता... त्याचा तळ इतर ब्राह्मण-मराठे सरदारांच्या तळाशेजारीच पडला होता. अर्थात सरदार मंडळीत मोठी चुळबूळ सुरू झाली व होता होता सवाई माधवरावांपर्यंत ही तक्रार पोचली. श्रीमंतांच्या शेजारी वृद्ध मराठा सरदार हिरोजी पाटणकर हे बसलेले होते. श्रीमंतांनी तक्रार ऐकून त्यांजकडे पाहिले. तो म्हातारा गुरगुरून म्हणाला, "ही काही जेवणाची पंगत नव्हे; तलवारबहाद्दर शूरांची पंगत आहे. येथे विटाळचंडाळ काही नाही. श्रीमंतांनी निकाल दिला की, शिदनाकाचा तळ आहे तेथेच असू द्यावा..."[२५]

पेशव्यांच्या फौजेत आणखी महार पथकदार असत असा शोध चांदोरकरांनी लावल्याचे माटे म्हणतात. गांधीजींच्या गुजराथमधले भूकंपग्रस्त पटेल दलितांच्या तंबूशेजारच्या तंबूत राहायला तयार नाहीत, तर पुण्यात येणाऱ्या महारांना गळ्यात मडके व कमरेला काटेरी खराटा-पसाटी बांधायला लावणाऱ्या पेशवाईत किती जातिभेद असणार ना? रोगाचे गांभीर्य कमी लेखणे म्हणजे तो बरा करायचा नाही असा अर्थ होतो. या इतिहाससंशोधकांचे म्हणणे खरे मानले, तरी अस्पृश्य सैनिकांना पेशव्यांच्या सैन्यात मिळणारी वागणूक व ब्रिटिश फौजेत मिळणारी वागणूक सारखी होती असे म्हणण्याचे धाडस कोणी करणार नाही.

जातिव्यवस्थेच्या जुलमात जरी ब्राह्मणेतर सवर्णही सामील होते, तरी त्याची **मुख्य** जबाबदारी ब्राह्मण जातीवर होती हे मानायला पाटणकर तयार नाहीत –

"भक्तिमार्गाच्या शिकवणुकीने व्यक्ती-व्यक्तींमध्ये व जातीजातींमध्ये समानता प्रस्थापित करण्याचाही प्रयत्न केला याविषयी दुमत होण्याची शक्यता कमी आहे. पण या आध्यात्मिक पातळीवरील व्यक्तिवादामुळे समाजजीवनावर कितपत परिणाम झाला, याविषयी निश्चित मतभेद होतील... संतांची शिकवण घेतलेल्या या समाजात एकोणिसाव्या शतकातही जरठ-कुमारीविवाह, विधवांचे केशवपन, पुनर्विवाहाला बंदी, जातिभेद या गोष्टी प्रचलित कशा होत्या? कॅथॉलिक पंथात पोप व त्याच्या हाताखालचे चर्चचे बिशप यांच्या हातात धार्मिक-ऐहिक अधिकार एकवटले होते. तसे महाराष्ट्रात हे दोन्ही अधिकार कोणाच्या हातात एकवटले होते? ब्राह्मणांच्या हातांत ते होते असे दिसत नाही. जेथे योगायोगाने ब्राह्मण राज्यकर्ते झाले ती राज्ये सोडल्यास कोणत्या ब्राह्मणांच्या हातात ऐहिक सत्ता होती?... जातिजातीतील उच्चनीचतेचे झगडे ब्राह्मणांच्या नव्हे तर राज्यकर्त्यांच्या मार्फत सोडविले जात असत, असे बिदरच्या राजाकडून महारांनी मिळविलेल्या बावन्न हक्कांच्या सनदेवरून दिसते. देवाभक्तांतील मध्यस्थी असंख्य विधिविधानांत गुरफटून टाकली होती असे म्हणून कोणत्याही एका गटाची व ग्रंथाची सर्वंकष सत्ता मध्ययुगात होती असे ठरत नाही. दुधातुपाचा अभिषेक करणे यापासून कोंबड्या-बकऱ्यांचे बळी देणे, मद्यमांसाचा नैवेद्य दाखवून देवीची पूजा करणे या सर्व बाबतीतल्या विधिविधानांचा उगम एक व्यक्ती, गट, जात, ग्रंथ असेल हे शक्य वाटत नाही... महाराष्ट्रातील व्यक्ती बांधल्या गेल्या होत्या हे खरे. मात्र त्यांना जातीतील, खेड्यातील समष्टींनी बांधले होते. ब्राह्मणाचा किंवा इतर कोणत्याही जातीचा बडेजाव वाईट हे खरे; पण बद्धतेचे मूळ... प्रत्येक जातीतील, खेड्यातील, वेगवेगळ्या स्थानिक देव-देवतांभोवतीच्या मानवसमूहात आहे...."[२६]

महारांना सनद देणारा बिदरचा सुलतान होता; हिंदू राजा असता तर श्रुति-स्मृतिपुराणोक्त धर्मशास्त्र घेऊन ब्राह्मण आडवे पडले असते. श्रौत धर्म हा वर्णसमाजाचा धर्म होता, तर स्मार्त हा बुद्धकाळापासून जातिसमाजाचा धर्म बनला आणि शूद्रांसाठी पुराणोक्त धर्म श्रौत-स्मार्त धर्माला जोडला गेला. ब्रिटिशांचा 'कायद्यापुढे सर्व समान' हा भांडवलदारी कायदा येईपर्यंत ब्राह्मण वर्णजातीला कायदातीत ठेवणारा आणि एकाच गुन्ह्याबद्दल क्षत्रिय, वैश्य व शूद्र वर्णजातींना चढत्या भांजणीने शिक्षा देणारा धर्मशास्त्राचाच कायदा लागू



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होता. ब्राह्मण वर्णजातीच्या गरजेनुसार श्रौतस्मार्त धर्माचा विकास पुराणोक्तपर्यंत कसा झाला हे मी *जातिव्यवस्थाक सामंती सेवकत्व* या ग्रंथामध्ये दाखवले आहे.

जातींनी आपापले अंतर्गत नियमन आपापल्या कायद्यांनी करावे हे श्रौतस्मार्त धर्मानेच आज्ञापित केले आहे. पण, जातिधर्माच्या कक्षेबाहेरील कज्जे राजा किंवा त्याचे अधिकारी ब्राह्मण धर्मशास्त्र्याच्या साह्यानेच सोडवीत असत. याचे उदाहरण *लीळाचरित्रा*त मिळते. चक्रधरस्वामींचे सौंदर्य पाहून एका चांभाराला 'स्थिति' झाली आणि तो देव म्हणून फिरू लागला व लोक त्याला भजू लागले. त्याच्या गावच्या चांभारांनी त्याची जात आंबेजोगाईला उघड केल्यानंतर लोकांनी त्याला तेथले अधिकारी जगळदेव व विंझदेव यांच्याकडे नेले. त्यांनी धर्मशास्त्र्यांना बोलवून या पापाबद्दल प्रायश्चित्त विचारले. त्यांनी सांगितले, की या चांभाराला चुन्याच्या कळीत बसवा आणि वरून पखालींनी पाणी ओता. तसे करून त्याला ठार मारले गेले.[२७] हे अधिकारीही ब्राह्मण होते हे लक्षात घेतले पाहिजे.

आपल्याला संस्कृत समजत नाही म्हणून आपल्याला ब्राह्मण धर्मशास्त्री सांगेल त्याप्रमाणे न्याय द्यावा लागतो, म्हणून शिवाजीने संभाजीला संस्कृत पंडित करवले. ब्राह्मण कारभाऱ्यांनी संभाजी राजा झाल्यानंतर वर्षभरातच त्याला विषप्रयोग करून औरंगजेबपुत्र अकबर याला स्वराज्य द्यायचा अयशस्वी प्रयत्न केला आणि मग वरिष्ठ मराठा वतनदारांशी संगनमत करून त्याला औरंगजेबाच्या हवाली केले हे कमल गोखलेंनी दाखवले आहे आणि वसंत कानेटकरांना *शिवशाहीचा शोध*मध्ये नमूद करावे लागले आहे.

शेतसाऱ्याचा मोठा वाटा (८२% ते ७५%) सरंजामदारांना मिळे असे पाटणकर पा. ५५-५६ वर म्हणतात. या सरंजामदारांमध्ये गावपातळीच्या वतनदारांपासून ब्राह्मण बरोबरीने होते आणि नोकरशाही तर त्यांनीच बनलेली होती. या वतनदारांच्या सामर्थ्याबद्दल 'आज्ञापत्र' सांगते –

"राज्यातील वतनदार, देशमुख व देशकुळकर्णी पाटील आदीकरून यांस वतनदार म्हणून म्हणावे, ही प्राकृत परिभाषा मात्र आहे. हे स्वल्पच परंतु स्वतंत्र देशनायकच आहेत..."[२८]

सभासद तर म्हणतो – "मुलखात साहेबी कारकुनाखेरीज कोणाची नाही."[२९]

यावरून निदान मध्ययुगीन सरंजामशाहीत बाह्य संघर्ष जरी तुर्की साम्राज्यसत्ता व शिवाजीसारखे स्वदेशी विद्रोही यांच्यात असला, तरी अंतर्गत संघर्ष, भक्तिचळवळ, बसवेश्वर, महानुभाव ते शिवाजी-संभाजी यांचा ब्राह्मणी विरोधी अब्राह्मणी असा होता हे स्पष्ट होते. नलिनी पंडितांनी गेल ऑमव्हेट यांच्या *कल्चरल रिव्हॉल्ट इन ए कलोनिअल सोसायटी, द नॉन-ब्राह्मण मूव्हमेन्ट इन वेस्टर्न इंडिया : १८७३ टु १९३०* या पुस्तकाचे *एकॉनॉमिक अँड पोलिटिकल वीकली*मध्ये परीक्षण करताना पाटणकरांसारखा, पण वर्णव्यवस्थेपर्यंत जाणारा, आरोप केला होता. या साप्ताहिकाच्या १९७९ सालच्या 'कास्ट अँड क्लास इन इंडिया' या खास अंकातील 'डायलेक्टिक्स ऑफ कास्ट अँड क्लास कॉन्फ्लिक्ट्स' या पेपरमध्ये भारतीय शोषणपीडनात ब्राह्मण वर्णाचे व नंतर जातीचे कसे प्राधान्य होते हे मी सप्रमाण दाखवले आहे. यावरून वर्णव्यवस्थेच्या उदयापासूनचे भारतीय इतिहासाचे सूत्र ब्राह्मणी विरुद्ध अब्राह्मणी हे होते हे सिद्ध होते.

मार्क्सच्या एकप्रवाही वर्गीय ऐतिहासिक भौतिकवादी अन्वेषणपद्धतीऐवजी बहुप्रवाही ऐतिहासिक भौतिकवादी अन्वेषणपद्धतीचे हे सूत्र भारतीय इतिहासाला लावल्याशिवाय तो उलगडत नाही. पण, अन्वेषणपद्धत ही व्यवहारित तत्त्वज्ञान (applied philosophy) असल्यामुळे ज्ञान मिळवायचे तिचे साधन प्रमाणशास्त्र असणे अपरिहार्य आहे. मार्क्सवादी अन्वेषणपद्धतीचे प्रमाणशास्त्र जसे प्रतिबिंबवाद (reflectionism) आहे तसे आंबेडकरी नवबौद्धवादाच्या अब्राह्मणी अन्वेषणपद्धतीचेही प्रतिबिंबवाद आहे. कारण बुद्ध जरी योगाचा पुरस्कार करीत होता, तरी त्याचा मुख्य संघर्ष वर्णव्यवस्थेविरुद्ध होता. उगवत्या जातिव्यवस्थेविरुद्ध जरी त्याने आवाज उठवला, तरी वर व *जातिव्यवस्थाक सामंती सेवकत्व* मध्ये दाखवल्याप्रमाणे ती सहा लक्षणांनी युक्त अशी व्यवस्था बनायला अनेक शतके अवकाश होता, आणि ब्राह्मणी तत्त्वज्ञानांची प्रतिचढाई दुसऱ्या शतकापासून सुरू होणार होती. मगच तत्त्वज्ञान-व्यवस्थांच्या (philosophical systems) संघर्षाचा काळ सुरू होणार होता. या संघर्षातच प्रमाणशास्त्रादींची गरज लागली.

प्रमाणशास्त्र म्हणजे ज्ञान मिळवण्याच्या साधनांचे शास्त्र. ज्ञानेंद्रियांनी जे ज्ञान मिळते ते प्रत्यक्ष या प्रमाणाखाली येते. जे दिसते त्याच्या आधारे न दिसणाऱ्या वस्तूचे ज्ञान मिळवणे हे अनुमान या प्रमाणाखाली येते. गणितात केवळ चिन्हांनी

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ज्ञान मिळते. पण त्याचा खरेपणा व्यवहारात तपासला जातोच. अशा प्रकारची ज्ञाने ही अनुमानाच्या उच्चतर अवस्था होत. ब्राह्मणी तत्त्वज्ञानांनी शब्द (वेद, आगम, इ.) आप्त (मान्यवर व्यक्ती), इ. पासून मिळणाऱ्या ज्ञानांना स्वतंत्र प्रमाणे मानलेली असली, तरी ती अनुमानातच जमा होतात. ही तत्त्वज्ञाने ईश्वर, कर्म, पाप-पुण्य, स्वर्ग-नरक, पुनर्जन्म इ. ना. सिद्ध करण्यासाठी अनुमानाचा उपयोग करीत. म्हणून असे अनुमान भारतीय भौतिकवाद्यांनी (चार्वाक, लोकयातिक) नाकारलेले असले, तरी ते प्रत्यक्षाधारित अनुमानही नाकारीत होते असे नाही. म्हणून प्रमाणे मूलतः दोनच ठरतात : प्रत्यक्ष व अनुमान. या प्रमाणांनी मिळणारे सर्व उपरोक्त ज्ञान जाणिवेच्या (consciousness) सदराखाली येते. पाश्चात्य तत्त्वज्ञाने – कॉडवेलचा अपवाद वगळता – जाणिवेची तत्त्वज्ञाने आहेत असे आर्नोल्ड टॉइनबी व दैसाकू इकेडा त्यांच्या *चूज लाइफ* मध्ये म्हणतात.[३०] माणूस ज्याप्रमाणे जाणिवेने कळत कृती करतो त्याप्रमाणे नेणिवेने नकळत कृती करतो, आणि समाजही जाणिवेप्रमाणे नेणिवेने कृती करतो. नेणिवेने कृती करायला मेंदूच उद्युक्त करीत असल्यामुळे जाणिवेप्रमाणे नेणिवेचे स्थान मेंदूच आहे. फ्राइडने (१८५६-१९३९) हे प्रायोगिकरीत्या सिद्ध करण्याआधी ४थ्या शतकातल्या वसुबंधूने त्याच्या 'अभिधर्म-कोशा'त मेंदूची ही द्वैती रचना 'चित्तसंप्रयुक्त' (जाणीव) व 'चित्तविप्रयुक्त' (नेणीव) या संज्ञांखाली मांडली होती. या मानसिक वस्तुस्थितीचे त्याचा शिष्य दिग्नाग (इ.स. ४००-५००) याने दार्शनिक प्रमाणशास्त्रात रूपांतर केले. बुद्धाच्या अनित्यात्मक बाह्यार्थवादी (dialectical realism) तत्त्वज्ञानाने व प्रतिबिंबक अन्वेषणपद्धतीने वर्णव्यवस्थेचे खंडन होऊ शकत होते; पण, तीच हत्यारे ब्राह्मणी दार्शनिक छावणीने जातिव्यवस्थेचे नित्यत्व सिद्ध करायला वापरल्यानंतर बौद्ध महायानाला क्षणिकात्मक बाह्यार्थवाद (realism) व जाणीव-नेणीवयुक्त प्रमाणशास्त्र यांची अनुक्रमे दार्शनिक व अन्वेषणपद्धतपर हत्यारे परजावी लागली. याचे विवेचन मी *जातिव्यवस्थाक सामंती सेवकत्व* मध्ये केले आहे.

येथे आजच्या संदर्भात लक्षात घेतले पाहिजे ते हे, की दिग्नाग स्कूलचे सौत्रांतिक विज्ञानवाद हे तत्त्वज्ञान व अब्राह्मणी सौंदर्यशास्त्र ही जातिव्यवस्थान्तक संघर्षासाठी जन्माला आलेली आहेत. धर्मकीर्तीच्या (७वे शतक) *प्रमाणवार्तिक* मधील खालील श्लोकावरून हे निर्विवादपणे सिद्ध होते –

*"वेदप्रामाण्यं, कस्यचित् कर्तृवादः, स्नाने धर्मेच्छा,*
*जातिवाद-अवलेपः । सन्तापनः पापहानाय चेति*
*ध्वस्तप्रज्ञाने पंचलिंगानि जाड्ये ।।"*

(अक्कलशून्यतेची ही पाच लक्षणे आहेत : वेद प्रमाण मानणे, सृष्टीचा कोणी कर्ता मानणे, तीर्थस्थानातून पुण्य मिळते असे समजणे, जातिव्यवस्थेचा अहंकार बाळगणे व पापक्षयासाठी शरीराला क्लेश देणे.)

हा जातिव्यवस्थान्तवादी दार्शनिक संघर्ष शांतरक्षित (८वे शतक) त्याच्या *तत्त्वसंग्रह* या तर्कशास्त्रीय कृतीत अधिक उघडपणे करतो. लोकायतिक हे जरी जातिव्यवस्थे-विरुद्ध जास्त सुसंगतपणे लढत होते, तरी त्यांचे प्रमाणशास्त्र प्रतिबिंबवादी असल्यामुळे ते आज उपयोगी पडू शकत नाही. (ते भोगवादी असल्यामुळे समाजक्रांती करू शकले नाहीत हे, बुद्ध त्यांचा तिटकारा करीत होता म्हणून नाही, तर त्याने भोगवादी जीवन सोडून भिक्षुजीवन स्वीकारले यावरून स्पष्ट होते.)

मी या बहुप्रवाही अन्वेषणपद्धतीला विधायक अब्राह्मणी का म्हणतो हे आधी स्पष्ट केले पाहिजे. कारण त्याचा संबंध मग नेणिवेचा ठाव घेण्याशी येतो. आंबेडकरांनी राम व कृष्ण यांच्यावरील *द रिडल ऑफ राम अँड कृष्ण* लिहिताना राम व कृष्ण यांनी भारतीय इतिहासाला काय योगदान केले हे लक्षात न घेता त्यांच्यावर नकारात्मक टीका केली.[३१] यावरून त्यांची अब्राह्मणी अन्वेषणपद्धत नकारात्मक असल्याचे स्पष्ट होते. रामाने कमी उत्पादक स्त्रीराज्ये व मातृवंशक राजके नष्ट करून जास्त उत्पादक पितृसत्ताक चातुर्वर्ण्य राजकप्रथेचा प्रसार केला हे त्याचे भारतीय इतिहासाला योगदान आहे. कृष्णाने चातुर्वर्ण्य राजकापेक्षा दासप्रथाक उत्पादन पराकाष्ठेला नेणारे पहिले द्वैवर्ण्य अराजक आणले हे त्याचे भारतीय इतिहासाला योगदान आहे. त्यामुळे राम व कृष्ण जनमानसात परमेश्वरपदी पोचले. त्यांचे हे योगदान व ज्या गुणांमुळे ते हे योगदान करू शकले ते मांडून आजच्या सम्यक् मुक्तीला त्यांची भक्ती कशी अडथळा आहे हे विशद केले, तर बहुजनसमाज दूर न जाता प्रबोधित होईल. म्हणून मी बहुप्रवाही अन्वेषणपद्धतीला विधायक अब्राह्मणी म्हणतो.

भारतीय इतिहासाचा उलगडा करताना मिथ्सचा रहस्यभेद करावा लागतो. पण, मिथ्सचा रहस्यभेद म्हणजे नेणिवेचा ठाव असा अवश्यंभावीपणे अर्थ होत नाही. मिथ म्हणजे




मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अतिमानुषी पद्धतीने सांगितलेला इतिहास असे प्रतिबिंबवादी अन्वेषणपद्धतही सांगते. पांडव देवांची मुले नसून माणसांची होती या गृहीतकानुसार इरावती कर्वेंनी त्यांच्या *युगान्त* (१९६७) मध्ये युधिष्ठिर हा कुंतीला दासशूद्र विदुरापासून नियोगाने झालेला मुलगा होता असे पुराव्यानिशी सांगितले. पण, बाकी पांडव, विशेषतः कर्ण, कोणापासून झाले हे सांगितले नाही. जेवढे पुरावे युधिष्ठिराच्या पितृत्वाबद्दल आहेत, तेवढेच कर्णाच्या पितृत्वाबद्दल आहेत. पण, येथे ब्राह्मण्य आडवे आले असे मी माझ्या कर्णावरील व्याख्यानांत सांगत असतो. कुंतीला ब्राह्मणेतर विदुरापासून युधिष्ठिर झाला असे सांगताना ब्राह्मण्य आडवे येत नाही; पण, कुंतीला ब्राह्मण दुर्वासापासून कर्ण झाला असा रहस्यभेद करण्यात ब्राह्मण्य आडवे येत होते!

कुंतीला भीम व अर्जुन कोणापासून झाले हे उलगडायला महाभारतात निःसंदिग्ध पुरावे नाहीत. द्रोण हा त्याला अर्जुन स्वपुत्रापेक्षाही प्रिय असल्याचे सांगतो, ध्वनित करतो, यावरून तो अर्जुनाचा बीजिन् पिता असला पाहिजे, असे अनुमान काढता येते. धृतराष्ट्र हा महाबलवान होता, तसाच भीम आणि धृतराष्ट्राला भीमाबद्दल आंधळा द्वेष होता हे प्रेमाचे, प्रेमजन्य दुसरे टोक. म्हणून तो भीमाचा बीजिन् पिता होता असे अनुमान काढता येते.

**पण, जेथे अनुमानही हात देत नाही अशा नेणिवांचा रहस्यभेद करणे हे बहुप्रवाही विधायक अब्राह्मणी ऐतिहासिक भौतिकवादी अन्वेषणपद्धतीचे एवंविशिष्ट सामर्थ्य आहे.** ती विशिष्ट नैतिकता सार्वकालिक न मानता त्या विशिष्ट कालाचे अपत्य मानते. तर आज अनैतिक वाटणारे आचरण विशिष्ट काळी नैतिक आचरण होते असे मानते. सत्यवतीने कौमार्यात व्यासाला जन्म दिला आणि प्रथम भीष्माला व नंतर व्यासाला तिच्या विधवा सुनांशी नियोग करायला सांगितले, म्हणून तिला इरावती कर्वेंनी अनैतिकतेचा दोष दिला आहे. पण, हे त्यावेळचे धर्ममान्य आचार होते हे त्यांनी लक्षात घेतले नाही. सत्यवती उघडपणे व्यासाला आपला पुत्र म्हणत असे आणि कौरव व पांडव त्याला उघडपणे पितामह. पण, कर्ण जिवंत असेपर्यंत कुंती त्याला आपला कानीनपुत्र म्हणू शकली नाही. एका पिढीत नीतिनियम एवढे बदलले. कालचा लोकाचार तो आजचा दुराचार झाला. याचे मुख्य कारण पुरुषसत्ता जसजशी विकसित होत गेली, तसतसे स्त्री-स्वातंत्र्य आकसत गेले हे आहे. मार्क्सवादी अन्वेषणपद्धतीने कपोलकल्पित प्राथमिक साम्यवादाला मानवसमाजाच्या आद्यस्थानी ठेवून वैराज्य/स्त्री-राज्याने स्वातंत्र्य, समता व लोकशाही याबाबत केलेली पथप्रदर्शकता दुर्लक्षिली आहे. विधायक अब्राह्मणी अन्वेषणपद्धतीने हे दुर्लक्ष दूर करायला *दासशूद्रांची गुलामगिरी* पासूनच मी सुरुवात केलेली आहे आणि 'अपूर्ण जात्यन्तक भांडवलदारी लोकशाही क्रांती व तिची समाजवादी पूर्ती' या ग्रंथामध्ये त्याची निर्णायक सांगता होत आहे. (प्रस्तुत लेख हे सदर ग्रंथाचे पहिले प्रकरण.)

मार्क्सवादी अन्वेषणपद्धत ज्याप्रमाणे कपोलकल्पित प्राथमिक साम्यवादाला मानवसमाजाच्या आद्यस्थानी ठेवते, त्याप्रमाणे विधायक अब्राह्मणी अन्वेषणपद्धत स्त्री-राज्याला मानवसमाजाच्या आद्यस्थानी ठेवत नाही. भारतीय मानवसमाजाचीही सुरुवात वैराज्य-स्त्रीराज्यापासून होत नाही. स्त्री शेतीचा शोध आधी जंगलात अस्थिर, वाडग्याच्या शेतीच्या रूपात लावते आणि नंतर नदीच्या खोऱ्यात आपला गण घेऊन उतरते व नदीवक्त्र शेती करून सुस्थिर वैराज्य-स्त्रीराज्य स्थापते. तोपर्यंत तिची जमात अनेक उत्पादनप्रकारांतून जाते – अन्नचयन, मृगया, पशुपालन, इ. स्त्री-राज्य स्थापण्याची प्रक्रिया विसाव्या शतकापर्यंत जीव धरून राहिलेल्या ईशान्येच्या खासींपर्यंत चाललेली दिसते. खुद्द वेदात राजवंशावळीतला पहिला राजा आयु याला प्रसवणारी पुष्करराज्ञी उर्वशी, आद्य राष्ट्री-देवी निर्ऋतीनंतर कित्येक पिढ्यानंतर झाली. रामायणातली ताटका, गंगा व शरयूच्या संगमावरील मलद–करूषांच्या यक्षिणींची राणी आहे, तर शूर्पणखा गोदावरी खोऱ्यातल्या नाशिक जिल्ह्यातील राक्षसींची राणी आहे. आणि राम हा तर वैदिक राजवंशावळीतला ७२ वा राजा आहे! युधिष्ठिर हा राजवंशावळीत १०१ वा आहे.[३२] आणि त्याच्या राजसूय-दिग्विजयाच्या मोहिमेत सहदेवाला नर्मदाखोऱ्यातल्या माहिष्मतांचे स्त्रीराज्य समोरासमोरच्या लढाईत पराभूत करता येत नाही आणि राणी सुदर्शनेच्या पुत्राला फितवूनच अब्रू सावरता येते. खुद्द भीमाची प्रथम पत्नी हिडिंबा ही गंगाखोऱ्यातील राक्षसराज्ञी होती आणि घटोत्कचापासून हे स्त्रीराज्य मातृवंशक राजक झाले. तंत्राचे आंध्रातील श्रीशैल हे केंद्रीय पीठ शिवाजी-संभाजीच्या काळापर्यंत स्त्रीराज्य म्हटले जात होते आणि २ऱ्या शतकातल्या महाकवी अश्वघोषापासून वैज्ञानिक नागार्जुनापर्यंतचे सर्व महायानी आचार्य त्याचे यात्रिक होते.

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

'मालती-माधव'सारख्या भवभूतिकृत (७ वे शतक) संस्कृत नाटकांपासून कालिदासाच्या (५ वे शतक) 'मेघदूत' मधील उल्लेखांवरून श्रीशैल हे योगिनीसंचालित विश्वविद्यालय होते आणि महापंडिता योगिनी सौदामिनीवरून, तिच्यासारख्या पूर्वास्पृश्या त्याच्या पदव्युत्तर विद्यार्थिनी होत्या व शिक्षणाचे माध्यम नालंदाप्रमाणे संस्कृत होते असे दिसते. स्त्रीराज्याची एवढी प्रदीर्घ, अखंड व उच्चविद्यासंपन्न परंपरा भारताव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही देशाला लाभलेली नाही आणि तिला बदनाम करून नामशेष करायचे काम भारताशिवाय दुसऱ्या कोणत्याही देशाने केले नाही!

भारताचा उपलब्ध इतिहास व इतिहासाची साधने पौरुषेय असल्यामुळे ही सरस्वती नेणिवेच्या वाळवंटात गडप झालेली आहे. **या नेणिवेचा भेद पुरुषी वृत्तीला या सरस्वतीत तिलांजली देऊन स्त्रीवाद (feminist) सम दृष्टी स्वीकारल्याशिवाय करता येत नाही.** प्रतिभेला अलंकारशास्त्रात 'शक्तिपात' म्हटले आहे. शक्ती म्हणजे जगन्माता. पुरुषी अलंकार-शास्त्रालासुद्धा प्रतिभेला स्त्रीलिंगी व तिची जननी स्त्रीच करावी लागली!

प्रतिभा ही नेणिवेतून उद्‌भवते असे टॉइनबी म्हणतो.[३३] आणि प्रतिभा ही, पाटणकर म्हणतात त्याप्रमाणे, केवळ कलाकृती व ललित साहित्याची जननी नाही.[३४] टॉइनबी सांगतो, की धर्माचा साक्षात्कार व वैज्ञानिक शोध यांचे गणित, तर्कशास्त्र यांद्वारे व प्रयोगशाळेत ते सिद्ध होण्यापूर्वी नेणिवेत प्रस्फुरण होते. जगप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ जोसेफ नीडहॅम त्याच्या *सायन्स अँड सिव्हिलिझेशन इन चायना* (१९५४) या महाग्रंथात सांगतो, की न्यूटनच्या मेकॅनिक्सच्या नियमांचा अंदाज सूफी निझामुद्दीन औलिया याने १२व्या शतकात केला होता.[३५] तत्त्वज्ञानाची प्रेरणाही नेणिवेत होत असते. अणुवादाची प्रेरणा वस्तूचा तुकडा सूक्ष्मतम मर्यादेपलीकडे पडू शकत नाही हे पाहून झाली असावी असे नीडहॅम म्हणतो.[३६] **निरीक्षणांच्या कच्च्या मालाचे निष्कर्षाच्या पक्क्या वस्तूत संक्रमण करणारी अमूर्तीकरणाची (abstraction) प्रक्रिया ही नेणिवेतूनच होत असते.** आद्य तत्त्वज्ञान असलेल्या सांख्याचे दार्शनिक पदार्थ स्त्रीराज्याच्या सामाजिक पदार्थांतून कसे परिणत झाले ही मी *दासशूद्रांची गुलामगिरी* मध्ये दाखवले आहे. म्हणून हे तत्त्वज्ञान कपिल नावाच्या पुरुषाने निर्मिणे शक्य नव्हते. अस्तंगत स्त्रीराज्याच्या वंशजा असलेल्या कपिलेनेच निर्मिणे शक्य होते. तसेच सांख्यजन्य लोकायत तत्त्वज्ञानाची निर्मिती चार्वाक नावाच्या पुरुषाने नाही, तर चार्वी नावाच्या स्त्रीनेच केली असावी. उपनिषदांत अंगात येऊन तत्त्वज्ञान सांगणाऱ्या ब्रह्मवादिनी स्त्रिया दाखवल्या आहेत. **अंगात येणे हा नेणिवेचा स्फोट आहे.** नेणिवेच्या अंतःस्फुरणाला या स्फोटातून दैवी आज्ञेचे सामर्थ्य येत असल्यामुळे ब्रह्मवादिनी स्त्रियांनी अंगात येण्याचा अवलंब केला असावा.

'नग्नी' व मुक्तकेशा भूमाताप्रतिनिधी निर्ऋती गणसभेत गणशेतीचे समान वाटप चौपट व अक्षग्लहाद्वारे मंत्रगान व नृत्याने करताना झपाटलेलीच असणार! **समता व लोकशाहीच्या या अविभाज्यतेचा उगम अशाप्रकारे नेणिवेतून झालेला आहे.** याचे सप्रमाण विवेचन मी पुढे करणार आहे.

जॉर्ज थॉमसनने त्यांच्या *स्टडीज इन एन्शन्ट ग्रीक सोसायटी* (१९४९, १९५५) या ग्रंथराजात साहित्य, कला, विज्ञान व तत्त्वज्ञान आदिम मायेतून (primitive magic) कशी निघाली हे सप्रमाण दाखवले आहे. ते मार्क्सवादी अन्वेषणपद्धत पारंपरिकपणे धरून ठेवीत असल्यामुळे आदिम साम्यवाद व स्त्रीसत्ता यांच्यातला विरोध, दोघांनाही समांतरपणे मानीत असल्यामुळे सोडवू शकलेले नाहीत. पण, आदिम माया ही नेणीवप्रक्रिया असल्यामुळे ही सर्व तिची अपत्ये आहेत हे येथे लक्षात घेतले पाहिजे. तीं स्वतंत्र विद्या वा शास्त्रे होऊन विकसित होऊ लागेपर्यंत तीं मायेचा भाग होती हे लक्षात घेतल्यानंतर त्यांचा नेणीवभेद विधायक अब्राह्मणी अन्वेषणपद्धतीनेच होऊ शकतो हे स्पष्ट होईल. माया ही वेदात असुरविद्या मानली आहे.[३७] मायाचा धातू 'मा' असून त्याचा अर्थ मापणे वा मोजणे आहे, आणि मा पासूनच माता हा आईवाचक शब्द झालेला आहे. उपनिषदांत धान्ये (व कृषी) देवांनी असुरांपासून घेतली असे म्हटले आहे. कृषिमाया म्हणजे गणशेती वा गणधन समान वाटपासाठी मापणे वा मोजणे. हे काम निर्ऋतीपासून माता करीत. तैत्तिरीय संहिता ४-२-५ व वाजसनेयिसंहिता १२-६० निर्ऋतीने बांधलेल्या व्यक्तीला बंधमुक्त करायचा विधी आहे. बृहदारण्यक उपनिषदात (३.३.१, ३.७.१) अंगात येणाऱ्या ब्रह्मवादिनींना 'गंधर्व-गृहीता' म्हटले आहे. गंधर्व व अप्सरा निर्ऋतीची संतान, नैर्ऋत, मानली गेली आहेत. निर्ऋतीकडून राजपद मिळालेला वरुण ज्याला 'धरतो' त्याला 'वरुण-गृहीत' म्हणत.[३८]

माया वा जादूमध्ये अतिमानुषी शक्ती असते असे






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अजूनही मानले जाते. उमाजी नाईकाच्या दंडामध्ये असलेला ताईत जोपर्यंत काढला नाही तोपर्यंत त्याला फाशी लागली नाही असा लोकसमज आहे. विद्रोहाचे बंड अयशस्वी होऊन तो जरी मारला गेला, तरी लोक त्याला ही दैवी शक्ती प्रदान करतात. ज्या मेंडक महाश्रेष्ठीला भेटल्यानंतर बुद्धाला वर्ण-व्यवस्थाक दासप्रथान्तक समाजक्रांतीचा ठोस मार्ग सापडला, त्याला, त्याच्या कुटुंबीयांना व त्याच्या दासमुकादमाला 'विनय-पिटका'ने दिव्य बल प्रदान केले आहे.[३९] त्यामुळे हा ऐतिहासिक प्रसंग मिथ बनला आणि त्यामुळे त्याच्याकडे इतिहासज्ञ व प्राच्यविद्यापंडितांनी काय, खुद्द आंबेडकरांनीही दुर्लक्ष केले. बुद्ध भारताचा महत्तम क्रांतिकारी होता असे जरी ते अचूकपणे म्हणत, तरी या मिथचा उलगडा न झाल्याने बुद्धाने कोणती समाजक्रांती केली हे ते सांगू शकले नाहीत. बुद्धोत्तर काळात भारतीय समाजाचे उत्पादन दसपटींनी वाढले असे अचूक निरीक्षण कोसांबींनी केले,[४०] तरी ते समाजक्रांतीमुळे झाले हे ते यामुळेच सांगू शकले नाहीत. या समाजक्रांतीत पुढाकार घेतलेल्या मेंडकासारख्या वित्त व वाणिज्य भांडवलदारांवर (money and trade capitalists) चर्चा आपण भारतीय भांडवलशाहीवरील प्रकरणात करणार आहोत.

**शस्त्रक्रियातीत मानसिक रोग बरे करण्यासाठी मनोविश्लेषणवादानुसार (psychoanalysis) संमोहनाने (hypnotism) रोग्याच्या मेंदूचे जाणिवेचे आवरण हरवून त्याची नेणीव उघडी करावी लागते आणि तिच्याशी संपर्क साधून मग उपचार करावा लागतो.** प्रतिबिंबवादी अन्वेषण पद्धतीनुसार - मग ती मार्क्सवादी असो वा बिगरमार्क्सवादी - जनप्रबोधनासाठी जनतेच्या जाणिवेपर्यंतच पोचता येते आणि बदल तिच्यातच घडवून आणता येतात. पण, टॉइनबी व इकेडा म्हणतात, की जाणीव व नेणीव अविभाज्य आहेत आणि शरीरशास्त्रीयदृष्ट्या जाणीव व नेणीव एकाच सेरेब्रल कॉर्टेक्समध्ये वसत असल्यामुळे ती वास्तवता आहे. म्हणून, प्रतिबिंबवादी अन्वेषणपद्धतीनुसारच्या प्रबोधनाने जनमनात वरपांगी बदलापलीकडे काहीच करता येत नाही. भांडवलदारी लोकशाही क्रांतीला सरंजामदारी माणसाऐवजी भांडवलदारी माणूस घडवायचा होता. भांडवलदारी स्वातंत्र्य, समता व लोकशाही ही वरपांगीच आहेत; त्यांचा प्रत्यक्ष लाभ शोषकांनाच मिळतो, शोषितांना नाही. म्हणून, भांडवलदारी लोकशाही क्रांतीच्या प्रबोधनाला जनमनात वरपांगीच, सरंजामदारीऐवजी भांडवलदारीच, बदल घडवून आणायचा होता. पण, समाजवादी क्रांतीला नवमानव घडवायचा असल्यामुळे तिच्या प्रबोधनाला वरपांगी जनमनपरिवर्तन करून भागणार नव्हते. सोव्हिएत नेत्यांनी – त्यात लेनिन येतो – भांडवलदारी लोकशाही नाकारून एकदम समाजवादी लोकशाही आणायचा, व तीही प्रतिबिंबवादी अन्वेषणपद्धतीच्या प्रबोधनाने, प्रयत्न केला; म्हणून तो फसला.

सरंजामशाही, भांडवलशाही व समाजवाद हे भौतिक बदल आहेत आणि त्यांची अपरिहार्यता जाणून ते घडवून आणले पाहिजेत. लेनिनने भांडवलशाहीचा टप्पा अखंड क्रांतीच्या नावाखाली टाळायचा प्रयत्न केला. स्टालिनने भांडवलदारी लोकशाहीचा अपरिहार्य टप्पा नाकारून हनुमान उडीने कपोलकल्पित मॉर्गन-एंगल्सप्रणीत समाजवादी लोकशाही आणायचा प्रयत्न केला. अपरिहार्य भौतिक व मानसिक बदलांचे क्रम विशिष्ट मर्यादेपर्यंत नियंत्रित करता येतात, पण ते टाळता येत नाहीत.

भारत आज जातवर्गीय समाजावस्थेत आहे. जात आहे म्हणून तो निमसरंजामशाहीत आहे आणि वर्ग आहे म्हणून तो निमभांडवलशाहीत आहे. ही अर्धवट अवस्था अर्धवट क्रांतीमुळे झाली, भांडवलदारी लोकशाही क्रांती पश्चिमेप्रमाणे पूर्ण झाली नाही, असे पाटणकरांचे म्हणणे आहे –

"येथे अनेक शतकांच्या सरंजामशाहीमुळे आधुनिक जगात न चालणारी एक जीवनदृष्टी निर्माण झाली होती. तिच्यात व्यक्तीला महत्त्व नव्हते, तर राज्यकर्त्यांना, समाजधुरीणांना, संयुक्त कुटुंबातील प्रमुखांना, खेड्यांतील प्रशासकांना, जात-पंचायतींना सर्व महत्त्व होते. त्यांतून व्यक्ती बाहेर पडणे आवश्यक होते.... ती भारतात आजही पूर्ण झालेली नाही; म्हणूनच आजसुद्धा आपल्याकडे घराणेशाहीचे स्तोम आहे; एके काळी राज्य केलेल्या थोर पुढाऱ्याच्या नातवंडा-पतवंडांच्या पुढेही आम्ही लाचारी पत्करतो. आपली जातिनिष्ठा आपल्या सर्व जीवनाचे नियंत्रण करीत असल्याचे आपण दर क्षणी पाहतो आहोत. गेली काही वर्षे सामाजिक न्याय-अन्यायाचे प्रश्नही आम्ही जातिव्यवस्था मनात बाळगूनच सोडवू लागलो आहोत."[४१]

पण, त्यांची वर्गवादी एकप्रवाही मार्क्सवादी अन्वेषणपद्धत त्यांना जातिव्यवस्था ही अधिरचना मानायला मजबूर करते. कारण पाया वर्गीयच असू शकतो! भांडवलदारी लोकशाही



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

क्रांतीने संपवायची राहिलेली भारतीय सरंजामशाही कोणती हे न सांगताच ते भरतवाक्ये लिहितात –

"एकोणिसाव्या शतकात येथे वेगवेगळ्या स्थित्यंतरांची प्रक्रिया सुरू झाली. ती पुरी झाली असती, तर आमच्याकडचे निदान काही प्रश्न सुटले असते. उदाहरणार्थ, आर्थिक स्थित्यंतराने वेग घेतला असता तर महाराष्ट्रातील दारिद्र्य जाऊन काही प्रमाणात संपन्नता आली असती. शैक्षणिक स्थित्यंतर पूर्ण झाले असते, तर आमच्याकडून कोठल्या तरी विद्याशाखेत थोडीफार मौलिक भर पडली असती. आणि साहित्यिक स्थित्यंतर पुरे झाले असते तर ज्यांना पाहून जग मान तुकवील अशा साहित्यकृती निर्माण झाल्या असत्या. पण यांतील एकही स्थित्यंतर पूर्ण झाले नाही.... सुरू झालेली क्रांती अपूर्णच राहिलेली आहे."[४२]

पाटणकरांना अभिप्रेत असलेली 'काही प्रमाणात' आर्थिक संपन्नता सामान्य माणसांची, उत्पादकांची आहे. इंग्लंडमध्ये भांडवलदारी उत्पादनसाधने आल्यानंतर किती प्रचंड प्रमाणात उत्पादन वाढले हे त्यांनी आकडेवारीने मांडले आहे. इंग्लंडमध्ये राज्यक्रांती झाल्याचे ते नाकारीत असले, तरी आर्थिक क्रांतीमुळे उत्पादन किती अभूतपूर्व वाढले हे ते सांगतात. त्यातून अनेक वीरजी व्होरा व जगत्शेट खिशांत टाकतील असे इंग्रज भांडवलदार तयार झाले आणि त्याचा 'फॉल आऊट' उत्पादकांच्या 'काही प्रमाणात' संपन्नतेत झाला. त्यावेळचे इंग्रजी साहित्य पाहता 'संपन्नता' हा शब्द कितपत लागू पडतो हा प्रश्न आहे. राहणीमान वाढले असे म्हणता येईल. **कोणत्याही समाजक्रांतीचे महत्तम वैशिष्ट्य हे, की ती जुन्या समाजाच्या तुलनेत उत्पादन अनेकपटींनी वाढवते.** दासश्रमाने अतिरिक्त उत्पादन करू लागलेल्या समाजापूर्वी माणसांना सर्वात भीषण मृत्यू भूकमरी वाटायचा – 'अशनाया हि मृत्यु: ।'[४३] ॲडम स्मिथच्या मते दासश्रम समाजाचे उत्पादन दुपटीने वाढवतात.[४४] वर्णव्यवस्थाक दासप्रथासमाजाच्या तुलनेत जातिव्यवस्थाक सामंतप्रथासमाजाने उत्पादन दहा पटींनी वाढवले. आजचा स्वतंत्र भारताचा समाज जातवर्गीय झालेला असूनही त्याच्या दारिद्र्याचे कारण आर्थिक नसून सामाजिक आहे, वर्गीय नसून जातीय आहे, असे मंडल आयोग म्हणतो –

"It was the all pervasive tyranny of this caste system which kept the lower castes socially backward and economically poor. The poverty of these castes stemmed from their social discrimination and they did not become socially backward because of their poverty. In view of this, historical and sociological evidence does not support the view that, in the ultimate analysis, social backwardness is the result of poverty to a very large extent...."[४५]

याचा अर्थ हा, की भारताचे अर्थशास्त्र युरोपप्रमाणे वर्गीय नाही, तर जातवर्गीयच असू शकते. हे अर्थशास्त्र उभारण्याचा प्रयास आंबेडकरांनी, राजकारणाला अग्रक्रम द्यावा लागल्याने, स्वातंत्र्यपूर्व चौथ्या दशकात सोडला. भारतीय समाजक्रांतीच्या प्रबोधनाचे पायाभूत अंग अजून अपुरे राहिलेले असल्यामुळे आणि आंबेडकरांची अन्वेषणपद्धत नकारात्मक अब्राह्मणी राहिल्यामुळे या प्रबोधनाचा अजून प्रारंभ झालेला नाही असे म्हणावे लागते.

पण, पाटणकरांच्या मते महाराष्ट्राच्या शिक्षित तरुणांनी १९व्या शतकाच्या उत्तरार्धात रनेसान्स, रिफॉर्मेशन व एन्लायनमेन्ट या चळवळी सुरू केल्या.

"युरोपात चौदाव्या शतकानंतर साधारण तीन-चार शतकांत सांस्कृतिक पुनरुज्जीवन (Renaissance), धर्मसुधारणा (Reformation), बुद्धिवादावरील भर (Enlightenment) ह्या महत्त्वाच्या चळवळी होऊन गेल्या. अशाच चळवळी आपल्याकडेही व्हाव्यात असे आधुनिक शिक्षित तरुणांना तीव्रपणे वाटत असल्याचे एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात सतत जाणवते."[४६]

येथे असलेली प्रमेयात्मकता मग पाटणकर सोडून म्हणतात – '...आपल्याकडे एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर नुसता रनेसान्स सुरू झाला असे नाही, तर रिफर्मेशन व एनलायटनमेंट या चळवळीही सुरू झाल्या. म्हणून एकाच वेळी आपल्याला स्वतंत्र झालेल्या मानवी मनाचा विविध क्षेत्रांतील दिमाखदार विलास, बहुतेक सामाजिक-धार्मिक सुधारणांच्या मुळाशी असलेला व्यक्तिवाद आणि लोकभ्रमांचा नाश करायला सज्ज झालेला ऐहिक क्षेत्रातील बुद्धिवाद या सर्वांचा प्रत्यय या काळात येतो."[४७]

या चळवळत्रयींचा स्रोत युरोपमधील भांडवलदारी लोकशाहीवादी दार्शनिक होते याकडे पाटणकर पूर्ण दुर्लक्ष करतात. भारतामधील तथाकथित चळवळत्रयीचा स्रोत कोणती तत्त्वज्ञाने होती? शिळ्या कढीला ऊत आणणाऱ्या टिळकांच्या चातुर्वर्ण्यवादी कर्मयोगाशिवाय दुसरे तत्त्वज्ञान दिसत नाही. दासगुप्तांपासून चट्टोपाध्यायांपर्यंत अनेक दार्शनिक पंडितांनी

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

भारतीय तत्त्वज्ञानांच्या इतिहासावर लिहिले. चट्टोपाध्यायांनी तर *व्हॉट इज लिव्हिंग अँड व्हॉट इज डेड इन इंडियन फिलॉसॉफी* (१९७६) लिहिले; पण त्यांनी त्यासाठी जे निकष लावले तेच मुळात विपर्यस्त होते हे मी 'टू मार्क्सिस्ट आऊटलुक्स ऑफ इन्टरप्रेटिंग आयडिऑलॉजिकल अँड सोशल कॉन्फ्लिक्ट्स इन इंडियन फिलॉसॉफी' या १९७७ सालच्या पेपरमध्ये दाखवले आहे. (तो अजून अप्रसिद्ध आहे. त्याचा मराठी अनुवाद *सत्यसोधक मार्क्सवादी*त प्रसिद्ध झाला आहे.) एवढे महामंथन करूनही ते 'लिव्हिंग' तत्त्वज्ञान उभे करू शकले नाहीत. कारण मार्क्सवादाव्यतिरिक्त दुसरे कोणते 'लिव्हिंग' तत्त्वज्ञान असू शकते? याउलट, बाकीच्या बहुतेक पंडितांची निष्ठा टिळकांप्रमाणे चातुर्वर्ण्यवादी वेदान्ताशी असल्यामुळे ते युरोपप्रमाणे भांडवलदारी लोकशाही क्रांतीकडे घेऊन जाणारे तत्त्वज्ञान कसे उभे करणार? अपवाद केवळ सत्करी मुकर्जी व धर्मेन्द्रनाथ शास्त्री यांचा आहे. पण, ते जरी दिग्नाग स्कूलचे समर्थक असले, तरी ते या स्कूलने केलेल्या जातिव्यवस्थाविरोधी संघर्षाला आजच्या समाजक्रांतीशी जोडू शकले नाहीत.

अशाप्रकारे रेनेसान्स-रिफॉर्मेशन-एन्लायटनमेन्ट या भारतीय चळवळत्रयीचे कर्ते, अधिष्ठान व उद्दिष्ट ब्राह्मणी असल्यामुळे ती ब्राह्मणी होती असे म्हणावे लागते. अब्राह्मणी प्रवाहाचे पुनरुज्जीवन आधुनिक काळात फुलेंनी केलेले असूनही पाटणकर मात्र ते श्रेय त्यांना नाकारतात —

"स्वतः फुले कंत्राटदार होते हे सर्वश्रुत आहे. त्यांच्या व्यवसायाचा त्यांच्या घडणीवर परिणाम घडला असणे संभवनीय आहे. मात्र नुसत्या व्यवसायामुळे माणूस व्यक्तिवादी, स्वतंत्र वृत्तीचा होतो असे नाही. त्यासाठी बौद्धिक सिद्धांतनाचीही गरज असते. (V. Lenin, What is to be done? : 'Without a revolutionary theory there can be no revolutionary movement. (p. 28).... the role of the vanguard fighter can be fulfilled only by a party that is guided by the most advanced theory (p. 29).... The history of all countries shows that the working class, exclusively by its own efforts, is able to develop only trade union consciousness.... The theory of socialism, however, grew out of the philosophic, historical and economic theories that were elaborated by the educated representatives of the propertied classes, the intellectuals.' (p. 37) या मताचा उगम स्वतः मार्क्समध्ये मिळतो. (पाहा : कम्युनिस्ट मॅनिफेस्टो)..."[४८]

जातिव्यवस्थान्तक भांडवलदारी लोकशाही क्रांतीचे ढोबळ सिद्धांतन फुले व आंबेडकर यांनी केले आहे. ते तिचे तत्त्वज्ञान निर्मू शकलेले नसले, तरी त्यांनी नकारात्मक अब्राह्मणी अन्वेषणपद्धतीचे पुनरुज्जीवन केले याकडे दुर्लक्ष करता येणार नाही. स्वतः लेनिनने समाजवादी क्रांतीचे सिद्धान्तन केले आणि ती केली; पण तिचे परिणतीकरण समाजवादी समाजउभारणीत करण्यासाठी तो मार्क्सवादावरच अवलंबून राहिला, त्यापुढच्या तत्त्वज्ञानाचे त्याने सर्जन केले नाही. मार्क्सवादी अन्वेषणपद्धतीचे कालातीत घटक स्पष्ट करूनही तिचे प्रतिबिंबवादी प्रमाणशास्त्र व सौंदर्यशास्त्र आणि एकप्रवाहीपणा यांमुळे ती समाजवादी देशांमधील जनतेचे यशस्वी प्रबोधन करू शकली नाही एवढेच नाही, तर ती बिगरसमाजवादी देशांमधील भांडवलदारी लोकशाही क्रांत्यांचे प्रबोधन करायलाही असमर्थ ठरली आहे. 'रिडल' वरील वाग्युद्धात आंबेडकरांचे समर्थन करायचा रूपा कुलकर्णी व य.दि. फडके यांचा प्रयत्न मा.गो. वैद्य व दुर्गा भागवत यांनी हाणून पाडला. मी हस्तक्षेप केला नसता तर नामुष्कीच झाली असती. श्रीकांत तलगेरींनी *आर्यन इन्व्हेजन थिअरी अँड इंडियन नॅशनॅलिझम* मध्ये भारतात अनार्य कोणीच नव्हते, त्यामुळे वर्णव्यवस्था निर्मितीची जबाबदारी सर्वांचीच आहे असे सिद्ध करायचा जो प्रयत्न केला आहे त्याचा प्रतिवाद कोणीही केला नाही. शेवटी मलाच हस्तक्षेप करावा लागला. भारतीय जनता पक्ष व संघपरिवार यांनी सर्व क्षेत्रांमध्ये प्रतिचढाई सुरू केलेली आहे आणि प्राग्वैदिक काळापासून शिवाजी-संभाजी ते आजच्या काळाच्या इतिहासाचे भगवेकरण चालवले आहे. विधायक अब्राह्मणी अन्वेषणपद्धत व सौंदर्यशास्त्र यांच्याविना त्याचा यशस्वी सामना ना डावे करू शकतात ना आंबेडकरवादी.

पण, इतिहास, साहित्य व कला या क्षेत्रांतले विधायक अब्राह्मणी प्रबोधन क्रांतिकारी शक्तींचा यशस्वी बचाव करू शकते, समाजक्रांती करू शकत नाही. समाजक्रांतीला तिचे तत्त्वज्ञान लागते. किंबहुना नव्या प्रबोधनाची अन्वेषणपद्धत व सौंदर्यशास्त्र नव्या तत्त्वज्ञानामुळेच उभी राहतात. बुद्धाने प्रथम त्याचे अनित्यात्मक बाह्यार्थवादी (तो त्याला प्रतीत्य-समुत्पाद म्हणत असे) तत्त्वज्ञान निर्मिले, त्याच्या अब्राह्मणी

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अन्वेषणपद्धतीआधारे वर्णजातिवादी ब्राह्मणांचा त्याने वाग्युद्धात पराभव केला आणि मेंडकाकडून संभाव्य क्रांतीची झलक मिळताच पंचधम्मांच्या कार्यक्रमाधारे भिक्षुभिक्षुणींच्या क्रांतिकारी संघाद्वारे वर्णव्यवस्थाक दासप्रथान्ताची समाजक्रांती केली. फळे पडताना न्यूटनअगोदर सर्वांनी पाहिली होती. पडत्या फळाची झलक पाहून गुरुत्वाकर्षणाचा शोध न्यूटननेच लावला. बुद्धाची दृष्टी साधी दृष्टी नव्हती, तर क्रांतिकारी दार्शनिक दृष्टी होती, नवा संकल्पनाव्यूह होता.

असा संकल्पनाव्यूह भारतात तयार झाला नाही अशी तक्रार पाटणकर करतात. अशा संकल्पनाव्यूहाची प्राथमिक मांडणी जातिव्यवस्थेविरुद्धचे दार्शनिक युद्ध करताना दिग्नाग स्कूलने केली. त्याचे परिणतीकरण करायचा प्रारंभ *दासशूद्रांची गुलामगिरीने* केला, *जातिव्यवस्थाक सामंती सेवकत्वने* ते समाजवादी सौत्रांतिकवादाच्या सौंदर्यशास्त्राच्या सर्जनापर्यंत आणले आणि 'अपूर्ण जात्यन्तक भांडवलदारी लोकशाही क्रांती व तिची समाजवादी पूर्ती' या ३ ऱ्या खंडात त्याची सांगता होत आहे.

संदर्भ :


१. रा.भा. पाटणकर, *अपूर्ण क्रांती*, पा. सात-बारा, १-२९५, मौज प्रकाशन गृह, १९९९.
२. बी.आर. आंबेडकर, *हु वेअर दी शूद्राज? हाऊ दे केम टु बी द फोर्थ वर्ण इन इंडो-आर्यन सोसायटी*, पा. xi-xxii, १-२६७, थॅकर्स, ३ री आवृत्ती, १९७०. मराठी अनुवाद *दासशूद्रांची गुलामगिरी*, भा. १, पा. ५.
३. रा.भा. पाटणकर, उक्त, पा. १०५-२१६, इ.
४. उक्त, पा. नऊ.
५. उक्त, पा. अकरा.
६. उक्त, पा. १०३.
७. कार्ल मार्क्स, *ए कॉन्ट्रिब्यूशन टु द क्रिटिक ऑफ पोलिटिकल एकॉनॉमी*, १९७७, पा. २०-२१.
८. प्रभाकर पाध्ये, *मानव आणि मार्क्स*, पा. ११५-११६.
९. शरद पाटील, *जातिव्यवस्थाक सामंती सेवकत्व*, पा. ६-२३९.
१०. उक्त, *दासशूद्रांची गुलामगिरी*, भा.१, पा. १८.
११. जे. स्तालिन, *प्रॉब्लेम्स ऑफ लेनिनिझम*, मॉस्को, १९४५, पा. १४.
१२. धर्मेन्द्रनाथ शास्त्री, *क्रिटिक ऑफ इंडियन रिॲलिझम, ए स्टडी ऑफ दी कॉन्फ्लिक्ट बिटवीन दी न्याय-वैशेषिक ॲंड दी बुद्धिस्ट दिग्नाग स्कूल*, १९६४.
१३. *डॅ. बाबासाहेब आंबेडकर, रायटिंग्ज ॲंड स्पीचेस, खं. ३*, पा. ३२०.
१४. पां.वा. काणे, *हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र, खं. ५*, पा. ९२५-९२६.
१५. शरद् पाटील, *अब्राह्मणी साहित्यांचे सौंदर्यशास्त्र*, १९८८.
१६. *मुद्राराक्षसम्*, सप्तमोऽङ्कः।
१७. अबुल फझ्ल, *ऐन-इ-अकबरी*, भाषां. एम. ब्लॉकमन, i, पा. ३-४; सावित्री चंद्र, 'अकबर्स कन्सेप्ट ऑफ सुल्ह कूल, तुलसीज कन्सेप्ट ऑफ मर्यादा ॲंड दादूज कन्सेप्ट ऑफ निपख – ए कम्पॅरॅटिव्ह स्टडी', *सोशल सायन्टिस्ट*, सप्टें.-ऑक्टो. ९२.
१८. शरद पाटील, *जातिव्यवस्थाक सामंती सेवकत्व*, पा. ४०.
१९. उक्त.
२०. रा.भा. पाटणकर, उक्त, पा. ५५-५६.
२१. शरद् पाटील, *शिवाजीच्या हिंदवी स्वराज्याचे खरे शत्रू कोण, महंमदी की ब्राह्मणी?*, १९९२, पा. ३८.
२२. कमल गोखले, *शिवपुत्र संभाजी*, १९७१, पा. ४७६.
२३. पां.वा. काणे, *हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र, खं. १*, पा. ३.
२४. देवीप्रसाद चट्टोपाध्याय, *लोकायत*, १९५९, पा. ६५४-६५५.
२५. रा.भा. पाटणकर, उक्त, पा. ६६-६७.
२६. उक्त, पा. १६२-१६३.
२७. वि.भि. कोलते, *श्रीचक्रधरचरित्र*, १९५२, पा. १२०-१२१.
२८. *अमात्यकृत मराठेशाहीतील राजनीति, आज्ञापत्र*, सं.डॉ. प्र.न. जोशी, १९६०, पा. २६.
२९. *कृष्णाजी अनंत सभासदाची बखर कथित छत्रपती श्रीशिवप्रभूंचे चरित्र*, सं. वि.स. वाकसकर, १९६०, पा. २८.
३०. आर्नोल्ड टॉइनबी ॲंड दैसाकू इकेडा, *चूज लाइफ, ए डायलॉग*, १९८७, पा. २६.
३१. बी.आर. आंबेडकर, *डॉ. बाबासाहेब आंबेडकर, रायटिंग्ज ॲंड स्पीचेस, खं. ४*, रिडल्स इन हिंदुइझम.
३२. श्रीकांत तलगेरी, *आर्यन इन्व्हेजन थिअरी ॲंड इंडियन नॅशनॅलिझम*, १९९३, पा. ३३८ इ.
३३. आर्नोल्ड टॉइनबी ॲंड दैसाकू इकेडा, उक्त, पा. ३६.
३४. रा.भा. पाटणकर, उक्त, पा. २१८, २५३.
३५. जोसेफ नीडहॅम, *सायन्स ॲंड सिव्हिलिझेशन इन चायना*, खं. २, १९५४, पा. ९५-९६.
३६. उक्त, खं. १, पा. १५४-१५५.
३७. ए.ए. मॅक्डोनेल ॲंड ए.बी. कीथ, *वेदिक इंडेक्स ऑफ नेम्स ॲंड सबजेक्ट्स*, खं. २, पा. १५५.
३८. उक्त, पा. २४५.


(पान २६ पुढे चालू....)




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# विसाव्या शतकातील मराठी उपयोजित समीक्षा

रा.ग. जाधव



**१) उपयोजित समीक्षा : संज्ञा, वर्गीकरण, स्वरूप इत्यादी —**

उपयोजित समीक्षा म्हणजे अर्थनिर्णयन, विश्लेषण व मूल्यमापन इत्यादी प्रक्रिया ज्या तात्त्विक किंवा सैद्धान्तिक संदर्भचौकटीच्या आधारे केल्या जातात, ती चौकट गृहीत धरून अथवा अध्याहृत ठेवून केलेले विशिष्ट साहित्यकृतीचे किंवा साहित्यिकाचे विवेचन, असे स्थूलमानाने म्हणता येईल. या समीक्षेत विवेचनाची गरज म्हणून प्रसंगी अध्याहृत तत्त्वे कमीअधिक प्रमाणात विशदही केली जातात. उपयोजित समीक्षेत अवलंबिलेली तात्त्विक भूमिका प्रत्यक्षपणे कार्यरत असते, असे म्हणता येईल.

मराठी साहित्यविचारात सामान्यपणे समीक्षा म्हणजेच उपयोजित समीक्षा असे समजले जाते व ते फारसे चूक नाही. समीक्षा ही संज्ञा या अर्थाने वेगळी ओळख दाखविते, कारण सैद्धान्तिक, तात्त्विक, औपपत्तिक, शास्त्रीय अशी विशेषणे लावूनच दुसऱ्या प्रकारच्या म्हणजे शास्त्रीय व सैद्धान्तिक समीक्षेचा निर्देश केला जातो.

रसग्रहण, रसास्वाद, आस्वाद, स्वाद, समालोचन, आलोचना, समीक्षण, आत्मलक्ष्यी समीक्षा, परीक्षण यांसारख्या इतरही संज्ञांनी उपयोजित समीक्षेचा निर्देश करण्यात येतो. 'आकलन' असेही या समीक्षेचे वर्णन करण्यात येते. रा.भा. पाटणकरांनी 'विदग्ध' समीक्षा अशी संज्ञा सुचविली आहे.

"समीक्षा हा शब्द थोडा गोंधळात टाकतो. समीक्षा शब्दाने प्रत्यक्ष रसग्रहण सूचित होते, त्याप्रमाणे समीक्षातत्त्वही सूचित होते." (*आस्वाद* - १९७७ - निवेदनातील अवतरण) असे प्रभाकर पाध्यांनी म्हटले आहे.

आपल्या या पुस्तकाचे स्वरूप रसग्रहणांचा संग्रह असे असल्यामुळे *आस्वाद* हे नाव योजिले आहे, असेही ते सांगतात. तथापि उपयोजित समीक्षा म्हणजे समीक्षा, आणि आस्वादाचा अंतर्भाव याच समीक्षेत होतो, हा विचार आता मराठीत मान्य झाल्याचे दिसेल. पाटणकरांनी आस्वाद शब्द नाकारून 'वाचन' असा शब्द सूचित केला आहे.

***वर्गीकरण***

उपयोजित समीक्षेचे इंग्रजीत रूढ झालेले काही प्रकार म्हणजे पाठचिकित्सा, संस्कारवादी (इंप्रेशनिस्टिक) समीक्षा, न्याय-निर्णयात्मक (ज्युडिशिअल) समीक्षा, प्रतिकृतिवादी (माय-मिटिक) समीक्षा, परिणामलक्ष्यी (प्रॅग्मॅटिक) समीक्षा, आविष्कार-वादी (एक्स्प्रेसिव्ह) समीक्षा, रूपवादी समीक्षा इत्यादी. आधुनिक मराठी समीक्षापरंपरेत या विविध प्रकारांची प्रतिबिंबे पडत आल्याचे दिसून येते. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धा-तील मराठी उपयोजित समीक्षा आधुनिक मराठी साहित्याच्या भक्कम अधिष्ठानामुळे आपली स्वतंत्र ओळख हळूहळू करून देत आहे, असे म्हटले पाहिजे.

उपयोजित समीक्षेच्या प्रकारांचा व वर्गीकरणाचा प्रश्न आहेच व मराठीसारख्या विविधतापूर्ण व विपुल निर्मितीच्या साहित्यक्षेत्रात या प्रश्नाबाबत विविध दृष्टिकोन संभवतात हे खरेच आहे. समीक्षेचे विषय, साहित्यप्रकार, या समीक्षेसाठी प्रकटपणे उपयोजित केलेल्या पद्धती वा प्रणाली (उदा., गंगाधर पाटील यांची आदिबंधात्मक समीक्षा), या समीक्षेतील लक्ष्यविषय (उदा., लेखकलक्ष्यी, लेखनलक्ष्यी, वाचकलक्ष्यी, संस्कृतिलक्ष्यी इ.) या समीक्षेतील शैलीवैशिष्ट्ये, साहित्यातील मोठे प्रवाह वा संप्रदाय (उदा., महानुभाव साहित्य, शाहिरी साहित्य, दलित साहित्य) यांसारख्या निकषांच्या आधारे विशेषत : अभ्यासाच्या व मूल्यमापनाच्या सोयीसाठी उपयोजित समीक्षेचे प्रकार व वर्गीकरण करणे शक्य असते.

खरे तर चांगल्या व श्रेष्ठ साहित्यकृतीची बहुमितीय गुणवत्ता व अनेकार्थकता हीच बहुधा उपयोजित समीक्षेच्या विविध रूपांना व प्रकारांना जन्म देत असते (उदा., बालकवींच्या 'औदुंबर' वरील आणि आळेकरांच्या *महानिर्वाण* नाटकावरील विविधांगी समीक्षा). निर्मितीमधील नवता व प्रयोगशीलता यांमुळेही समीक्षेच्या वर्गीकरणाचा प्रश्न विस्तारत जातो आणि नवे साहित्यसिद्धान्त व समीक्षापद्धती यांच्यामुळे जुन्या वा प्राचीन साहित्याच्या समीक्षेची जी नवी रूपे पुढे येतात, त्यामुळे वर्गीकरणातील ऐतिहासिक कालखंडाचा निकष अस्थिर होतो.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

साहित्यप्रकारांप्रमाणेच समीक्षाप्रकारांची उपयुक्तता एका मर्यादेपर्यंत असतेच असते; पण नंतर मात्र ती उरत नाही.

उपयोजित समीक्षेचे वर्णनात्मक स्वरूपाचे, मूल्यनिरपेक्ष असे विषयनिष्ठ वर्गीकरण पुढीलप्रमाणे करता येईल :

१) विशिष्ट साहित्यकृतीची समीक्षा

२) साहित्यकृतींच्या विशिष्ट गटाची समीक्षा : उदा., *अंधारयात्रा :* त्र्यं.वि. सरदेशमुख, १९६८.

३) विशिष्ट साहित्यिकाची समीक्षा : यात या विशिष्ट साहित्यिकाच्या एकूणच निर्मितीची समीक्षा किंवा त्याच्या एका प्रकारातील निर्मितीची समीक्षा असे उपप्रकार संभवतात.

४) साहित्यिकांच्या विशिष्ट गटाची समीक्षा

५) विशिष्ट समीक्षकाची समीक्षा

६) विशिष्ट समीक्षकगटाची समीक्षा

७) विशिष्ट समीक्षाकृतीची समीक्षा

८) समीक्षाकृतींच्या विशिष्ट गटाची समीक्षा

९) विशिष्ट वाङ्मयीन कालखंड, प्रवाह, संप्रदायसमीक्षा

१०) अन्य भाषांतील साहित्यकृती, साहित्यिक, समीक्षा-कृती, समीक्षक इत्यादींची समीक्षा.

अर्थात उपयोजित समीक्षेची समीक्षा करताना वर्गीकरणाची वा प्रकारभेदांची संकल्पना महत्त्वाची असली, तरी या संकल्पनेचा तात्त्विक विचार प्रस्तुत निबंधाच्या स्थलमर्यादेत करणे शक्य नाही.

### स्वरूप

उपयोजित समीक्षेचे स्थूल मानाने जे स्वरूप संभवते ते पुढीलप्रमाणे : काही विशिष्ट वाङ्मयीन मूल्ये व/वा तशीच विशिष्ट जीवनमूल्ये यांच्या कळत-नकळत स्वीकारलेल्या चौकटीतून बहुधा स्वयंप्रेरणेने केलेली साहित्यकृतीची तर्कसंगत आकलने-मूल्यमापने हा उपयोजित समीक्षेचा मुख्य प्रकार होय. साधारणपणे या प्रकारची आकलने-मूल्यमापने प्रत्यक्षात विविध प्रकारच्या लेखनशैलींमधून होत राहिल्याचे दिसते. यासंबंधी मराठीतील अशा लेखनरीतींचा ढोबळ पट मी पुढील भागात दर्शविला आहे.

वाङ्मयीन व/वा वाङ्मयेतर तत्त्वसंदर्भाची अध्याहृतता वा गृहीतता किंवा प्रच्छन्नता हा उपयोजित समीक्षेचा प्रधान स्वरूपविशेष होय. दुसरा विशेष म्हणजे या समीक्षेत साहित्य-कृतीच्या मूल्यगर्भ वाचनाचा समग्र अनुभव हा प्राथमिक व सार्वभौम असतो. या प्राथमिक अनुभवातील उत्कट भावावस्थेला किंवा भावनात्मक चर्वणेला जेवढे महत्त्व असते, त्यापेक्षाही अधिक महत्त्व त्या अनुभवाने प्रेरित केलेल्या बौद्धिक प्रक्रियांना असते. आस्वाद या शब्दाने साहित्यकृतीच्या अनुभवातील भावनात्मक अंगाला कळत-नकळत अतिरिक्त महत्त्व दिले जाते व परिणामतः एक प्रकारची स्वैर, एकांगी आस्वादक समीक्षा निर्माण होते. म्हणून पाटणकर सुचवितात त्याप्रमाणे धनस्वरूपी मूल्यार्थ असलेल्या आस्वाद या संज्ञेऐवजी 'वाचन' ही संज्ञा स्वीकारून वाचन हाच उपयोजित समीक्षेतील प्राथमिक व सार्वभौम अनुभव असतो, असे म्हणणे योग्य ठरेल.

उपयोजित समीक्षेच्या या मूलभूत प्रकृतीच्या कक्षेत राहून मराठी समीक्षकांनी आपापल्या वैशिष्ट्यपूर्ण भूमिका प्रत्यक्षा-प्रत्यक्षपणे नमूद केलेल्या आहेत. त्यातून मराठीतील उपयोजित समीक्षेच्या वेगवेगळ्या वाटा व वळणे लक्षात येतात. अशा वैशिष्ट्यपूर्ण भूमिका लक्षात घेतल्याखेरीज प्रस्तुत समीक्षाशतक पूर्णपणे समजणार नाही. तथापि या निबंधाच्या मर्यादेत हा विषय मला घेता आलेला नाही. श्रीपाद कृष्ण ते भालचंद्र नेमाडे या शतकीय टप्प्यात उपयोजित समीक्षेसंबंधी एक उत्क्रांति-आलेखही दडलेला आहे, हे सांगितले पाहिजे.

या उत्क्रांतिदर्शक आलेखाचे वर्णन सामान्यपणे पुढील-प्रमाणे करता येईल : लेखक, त्याची साहित्यकृती, वाचक आणि या तीनही घटकांना, स्थलकालपरिस्थितीचा जो अवकाश वेढून असतो, त्यातील वाङ्मयीन व वाङ्मयबाह्य परंपरा हे घटक उपयोजित समीक्षेतील मुख्य आस्थाविषय असतात. उत्क्रांतीचे स्वरूप या आस्थाविषयांच्या उघड होत जाणाऱ्या नवनव्या अंगोपांगांशी, या नव्या अंगोपांगांच्या अंतर्बाह्य रंगरूपांशी आणि त्यांच्या साहित्यकृतीमधील सर्जनशील संरचनांशी निगडीत असते, असे म्हणता येईल. या दृष्टीने पाहिले, तर विसाव्या शतकातील उपयोजित मराठी समीक्षेची उत्क्रांती ढोबळपणे दिग्दर्शित करता येईल, ती अशी :

१) लेखकाच्या चरित्र-चारित्र्याचे समीक्षेतील भान कमी होत गेले व त्याऐवजी त्याचे सर्जनशील आत्मभान, वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व, वर्गीय जाणिवा यांचा काटेकोर विवेक उत्तरोत्तर वाढत गेला.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

२) साहित्यकृतीचा विचार बाह्य तांत्रिक रचना, आशयाँचा सामाजिक, नैतिक, तौलनिक व मूल्यमापनात्मक विवेक, सांस्कृतिक ध्येये वा उद्दिष्टे यांचा संदर्भ इत्यादी आस्था-विषयांकडून साहित्यकृतीची निर्मितिप्रक्रिया, तिच्यातील आशयद्रव्ये व आशयसूत्रे यांचे एकात्म संश्लेषण, या संश्लेषणातील समग्र शैलीरूपांचे स्वरूप इत्यादी अंगांकडे वळले. साहित्यकृतीच्या सेंद्रिय एकात्मतेची संकल्पनाही नव्या जीवशास्त्रीय संशोधनाने विकसित झाली.

३) आस्वादक वाचक व त्याचा आस्वाद-प्रत्यय यांच्या पकडीतून बाहेर पडून समग्र वाचक व त्याचा भावनिक-बौद्धिक प्रक्रियांनी आंदोलित होणारा व्यामिश्र वाचन-प्रत्यय यांकडे समीक्षा अधिक लक्ष देऊ लागली.

४) वाङ्मयीन-सांस्कृतिक परंपरा व परिस्थिती यांसंबंधीचे समीक्षीय भान उपरेपणाकडून अधिक अंतर्मुखतेकडे वळले.

या प्रकारच्या उत्क्रांतिस्वरूपाचा प्रत्यय प्रस्तुत समीक्षा-शतक देते, असे म्हटले.

प्रस्तुत समीक्षाशतकाचा स्थूल स्वरूपात उभा छेद घेतल्यास उत्क्रांतीची ऊर्ध्वरेषा ही साहित्यकृतीच्या एकात्म चैतन्यशील रूपाच्या समग्र आकलनाच्या भानाने प्रवर्तित झाल्याचे दिसून येते, असे म्हणता येईल. साहित्यकृतीच्या घटकांचे विश्लेषण व विश्लेषित मांडणी यांच्याकडून ही दिशा त्या घटकांच्या संश्लेषण व संश्लेषित मांडणी यांकडे जाताना दिसते. या दिशेने साहित्यकृतीचे वस्तुरूप व तिच्या प्रत्ययाचे व्यक्तिरूप यांच्याही मांडणीच्या अलग वाटा अधिकाधिक एकरूप होत जाताना दिसतात.

साहित्यकृतीचे चैतन्यरूप शोधण्याची आचवलांची समीक्षा, तिच्यातील अनुभव घेण्याची व व्यक्त होण्याची रचना शोधणारी गाडगीळांची समीक्षा, मर्ढेकरांची लयतत्त्वांची समीक्षा. वा.ल. कुलकर्णींची आशय-अभिव्यक्तीच्या सेंद्रिय एकात्मतेची समीक्षा, बेडेकरांची कलात्मक द्वंद्वाची कल्पना पाटणकरांची द्विध्रुवात्मकतेची संकल्पना यांसारख्या वाटा-वळणांनी पुढे जाणारी ही समीक्षा नेमाडे यांच्या जीवननिष्ठ नैतिकतावादी समीक्षेपर्यंत व त्यातील समग्र रूपरचनेच्या विस्तृत जाणिवेपर्यंत येऊन थांबल्याचे दिसते. खरे तर इथूनही पुढे ही समीक्षा आध्यात्मिक (मेटॅफिजिकल) उद्‌बोधनाकडे जाऊ पाहते (उदा., त्र्यं. वि. सरदेशमुख यांची समीक्षा). उत्क्रांतीमधील या ऊर्ध्वरेषेची अधिक सूक्ष्म मीमांसा करावयास हवी हे मात्र खरे.

**२) विसाव्या शतकातील उपयोजित मराठी समीक्षा : एक स्थूल नकाशा –**

विसाव्या शतकातील उपयोजित मराठी समीक्षा विपुल असून ती विविध लेखनप्रकारांतून निर्माण झालेली आहे. या लेखनप्रकारांची लक्षात आलेली रूपे पुढीलप्रमाणे सांगता येतील.

***१. प्रबंध व प्रबंधिका***

संशोधन, आकलन, आस्वाद व मूल्यमापन अशा व्यापक चौकटीत विशिष्ट साहित्यिक, साहित्यकृती, साहित्यप्रकार-विशिष्ट वा वाङ्मयीन कालखंडविशिष्ट अशी साहित्यनिर्मिती इत्यादींचा अभ्यास या लेखनप्रकारात समावेश होतो. उदा., व.दि. कुलकर्णी यांचा संगीत सौभद्र नाटकावरील प्रबंध, *उदाहरणार्थ कोसला* हा वासुदेव सावंत यांचा प्रकाशित ग्रंथ (१९९९), केशव सद्रे यांचा *कवितेतील आधुनिकवाद* (२०००) हा प्रकाशित प्रबंधग्रंथ.

***२. व्यक्ती व वाङ्मय***

या लेखनप्रकारातून मराठीत पुष्कळसे उपयोजित समीक्षालेखन झालेले आढळते. याच प्रकारातील लेखन 'चरित्र आणि वाङ्मय', 'व्यक्ती आणि कला' किंवा फक्त 'वाङ्मयदर्शन' याही मथळ्यांनी प्रसिद्ध झालेले आढळते. उदा., *सानेगुरुजी : व्यक्ती आणि वाङ्मय* (१९४६), *वि.स. खांडेकर : चरित्र आणि वाङ्मय* (१९४१), *तांबे : व्यक्ती आणि कला* (१९३५), *वामन मल्हार : वाङ्मयदर्शन* (१९४४).

डॉ. रा.चिं. ढेरे यांच्यासंबंधीचा व्यक्ती आणि वाङ्मय या प्रकारातील ग्रंथ *लोकसंस्कृतीचे प्रतिभ दर्शन* (२०००) या नावाने प्रसिद्ध झालेला आहे.

या प्रकारातील समीक्षा ही एकाची व संपादित केलेली अनेकांची या दुहेरी प्रकारांतील असते. उपर्युक्त साने गुरुजी-वरील पुस्तक अनेक लेखकांचे संपादन आहे.

***३. एक साहित्यकृती व अनेक समीक्षक***

एकाच साहित्यकृतीसंबंधी अनेक समीक्षकांनी केलेली मांडणी संकलित-संपादित करणारी पुस्तकेही मराठीत आहेत. उदा., नाडकर्णी यांनी बालकवींच्या 'औदुंबर' व 'बीं'च्या 'चाफा' यांवरील निवडक समीक्षणे स्वतंत्र पुस्तकरूपांत संपादित केलेली आहेत. *वाडा चिरेबंदी, भग्न तळ्याकाठी, युगांत : एक अवलोकन* (१९९६, संपा. डॉ. कमलेश), *महानिर्वाण*

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

*: समीक्षा आणि संस्मरणे* (१९९९, संपा. रेखा इनामदार-साने), *'देखणी'संबंधी* (२०००, संपा. नीलकंठ कदम), *सांगोपांग वासूनाका* ही या प्रकारातील काही इतर उदाहरणे.

***४. एक साहित्यिक व अनेक समीक्षक***

एकाच लेखकाच्या विविध निर्मितीची समीक्षा करणारे अनेक अभ्यासकांचे लेखन संगृहीत करण्याचाही प्रकार आढळतो. उदा., *सर्व सुर्वे*, रा.रं. बोराडे यांच्यावरील *घरशिवार* (१९९९, संपा., चंद्रकुमार नलगे), *वि.स. खांडेकरांचे साहित्य : एक आकलन* (२००१, संपा., अविनाश अवलगावकर), *'मृत्युंजय'कार शिवाजी सावंत : व्यक्ती आणि साहित्य* (२००१, संपा., शांताराम वाघ) इत्यादी.

***५. तौलनिक साहित्याभ्यास***

साधारणपणे १९८० नंतरच्या कालखंडात तौलनिक साहित्याची (म्हणजे दोन भिन्न भाषांतील साहित्याची) अभ्यासरीती पुढे आली. *तौलनिक साहित्याभ्यास – तत्त्वे आणि दिशा* (१९९२, संपा., चंद्रशेखर जहागीरदार) या पुस्तकातील 'वेटिंग फॉर गोदो आणि महानिर्वाण' (चारुदत्त भागवत) व 'बा.सी. मर्ढेकर आणि टी.एस. एलियट' (प्रकाश देशपांडे-केळकर) हे लेख या संदर्भातील उदाहरणे होत. हरिभाऊ आपटेकृत *'शाकुंतल व टेंपेस्ट'* ही तुलना तसेच दुर्गा भागवतकृत *रूपनगरची राजकन्या* व बंकिमचंद्रलिखित *राजसिंह* यांची तुलना (*आस्वाद व आक्षेप* – १९९१ – संपा. मीना वैशंपायन), रा.श्री. जोगकृत *'विरहतरंग व मेघदूत'* यांची तुलना ही अन्य उदाहरणे.

***६. साक्षेपी संपादन-ग्रंथांच्या प्रस्तावना***

मराठीतील उपयोजित समीक्षेची ही एक रीती आहे. नवे संशोधन, नव्या प्रकारची साहित्यनिर्मिती, साहित्यप्रकार-विशिष्ट निर्मिती, कालखंडविशिष्ट साहित्यकृती, विशिष्ट प्रणालिप्रधान साहित्यकृती, एखाद्या साहित्यिकाच्या निवडक कृती, निखळ पाठ्यपुस्तकी दृष्टी यांसारख्या सूत्रचौकटीतून विविध प्रकारची संपादने करण्यात येतात. अशा संपादनांतून प्रस्तावनेच्या रूपाने संपादित साहित्याची समीक्षा केली जाते. उदा., ... *ताराबाई शिंदेलिखित 'स्त्रीपुरुषतुलना'* (१९९७ - संपा. विलास खोले), *बोरकरांची कविता* (संपा., मंगेश पाडगावकर), *हरपले श्रेय* (संपा. रा.श्री. जोग), *सुहृदगाथा* (संपा. गंगाधर पाटील), *पाच कथाकार* (संपा. वि.स. खांडेकर), *गाडगीळांच्या कथा* (१९५८-२, श्री.पु. भागवत), *दलितांची आत्मकथने* (१९९९, संपा. वासुदेव मुलाटे) इत्यादी. या संदर्भात विलास खोले यांची भरीव कामगिरी त्यांनी संपादित केलेल्या वरील पुस्तकाखेरीज *शांतारामकथा* (१९९८), *राजेंद्र बनहट्टी : निवडक दीर्घकथा* (१९९८) तसेच *दंडकारण्यातील प्रणयिनी* (दिवाकर कृष्णांच्या कथा) याही पुस्तकांतून दिसून येते. स.गं. मालशे यांचे प्र.के. अत्र्यांच्या *झेंडूची फुले* या काव्यसंग्रहाचे संपादन व प्रस्तावना आदर्शवत् आहे. दिलीप चित्र्यांची भाऊ पाध्ये यांच्या निवडक कथासंग्रहाची प्रस्तावनाही महत्त्वाची.

***७. शैलीवैज्ञानिक समीक्षा***

१९८० नंतरच्या काळात मराठीत शैलीवैज्ञानिक समीक्षा तुरळक स्वरूपात लिहिली जाऊ लागली. या संदर्भात रमेश धोंगडे यांचे *शैलीवैज्ञानिक समीक्षा* (१९९६) तसेच रमेश धोंगडे–अश्विनी धोंगडे या उभयतांचे *आत्मलक्षी समीक्षा* हे पुस्तक उदाहरणादाखल सांगता येईल. स.गं. मालशे व मिलिंद मालशे यांचेही काही लेखन या प्रकारातील आहे, असे स्मरते.

***८. साहित्यिकाची समीक्षा : काही नैमित्तिक लेखनप्रकार***

गौरवग्रंथ, नैमित्तिक मुलाखती व संवाद, श्रद्धांजली, नैमित्तिक विशेषांक, मोठ्या पुरस्कार- पारितोषिकांची तसेच षष्ट्यब्दी, पंचाहत्तरी, जन्मशताब्दी यांसारखी निमित्ते यांतूनही लेखक-समीक्षा प्रवृत्त झाल्याचे दिसून येते. उदा., *श्रद्धांजली* (१९९६, विनय हर्डीकर), *तांबे : व्यक्ती आणि कला* (१९३५), *सानेगुरुजी : एक पुनर्मूल्यांकन, वि.स. खांडेकरांचे साहित्य : एक आकलन* (२००१), *संवाद* (विजया राजाध्यक्ष).

साहित्यसंमेलनांची अध्यक्षपदे ही त्या त्या लेखकाच्या साहित्यासंबंधीच्या विशेषांकांना जन्म देतात. त्याचप्रमाणे मोठ्या लेखकाच्या निधनाचे निमित्तही विशेषांकांना पुरते. विशेषांकांची उदाहरणे म्हणून *आमची श्रीवाणी* (धुळे) चा दिलीप चित्रे विशेषांक व *अनुष्टुभ्* चा नामदेव ढसाळ विशेषांक सांगता येतील. *अस्मितादर्श* या नियतकालिकाचे शंकरराव खरात व भालचंद्र फडके विशेषांक, *कवितारती*चे बालकवी व बोरकर विशेषांक तसेच *लोकशिक्षण*चे डॉ. केतकर व माधवराव पटवर्धन विशेषांक इ.

***९. पुस्तक-परीक्षणे***

पुस्तक-परीक्षणे हा उपयोजित समीक्षेचा एक बहुस्तरीय व विषमस्तरीय असा फार मोठा भाग आहे. *आलोचना*सारखे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नियतकालिक दर्जेदार परीक्षणांसाठीच सुरू झाले होते. ललित मासिकातील 'लक्ष्यवेधी' पुस्तकांचे सदर स्थूल परीक्षणांचे, तर 'मानाचे पानं' हे सदर विस्तृत परीक्षणाचाच एक प्रकार म्हणता येईल. या शतकातील वाङ्मयीन मासिकांची तसेच *विविधज्ञानविस्तार, नवभारत, समाज प्रबोधन पत्रिका, लोकशिक्षण* यांसारख्या नियतकालिकांची जी प्रदीर्घ परंपरा आहे, या परंपरेने पुस्तक-परीक्षणांना चालना दिली आहे. वृत्तपत्रांनीही परीक्षणांना थोडासा हातभार लावलेला आहे. पुस्तकपरीक्षणांचे काम अव्याहत चालू ठेवणारा एक वर्गच आढळून येतो. पुस्तकपरीक्षणे हा उपयोजित समीक्षेचा एक अभ्यसनीय उपविषय आहे, असे सांगता येईल.

### १०. अन्य भाषांतील साहित्यकृती, साहित्यिक इत्यादी

आधुनिक मराठी साहित्य व समीक्षा संस्कृत तथा इंग्रजी व इतर यूरोपीय भाषा यांतील साहित्य-समीक्षेने प्रभावित झालेली आहेत. त्यामुळे या मराठीतर भाषांतील साहित्यकृती, साहित्यिक यांवरील आस्वादक समीक्षेची एक छोटीशी धारा मराठीत निर्माण झाली आहे. उदा., न.शं. रहाळकरकृत *शाकुंतल सौंदर्य* (१९३६), मा.दा. आळतेकरकृत *कालिदासाची सृष्टी* (१९३७), ग.ह. केळकरकृत *शेक्सपियर व तत्कालीन इंग्रजी रंगभूमी* (१९३२), बा.सी. मर्ढेकरलिखित *लुइजी पिरांदेल्लो* (१९३५), विलास सारंगांचे *सिसिफस आणि बेलाक्वा* (१९८२), गंगाधर गाडगीळलिखित 'वॉर अँड पीस' ('दोन अपुरी रसग्रहणे'), *पाण्यावरची अक्षरे* - १९९८) इत्यादी. त्र्यं.वि. सरदेशमुख, विनय हर्डीकर, स.ज. भागवत, गंगाधर पाटील यांचेही काही लेख एमिली डिकिन्सन, खलील जिब्रान, हाइनरिक ब्योल, रवींद्रनाथ टागोर यांवरील आहेत. गंगाधर पाटील यांचे सार्त्रच्या *क्रीम पास्सीओनेल* या नाटकाचे समीक्षण (*समीक्षेची नवी रूपे* - १९८१) तसेच ब्रेश्टच्या *कॉकेशिअन चॉक सर्कल*ची सैद्धान्तिक मांडणी उल्लेखनीय आहे. दिलीप चित्रेलिखित यूरोपीय कवींवरील सहा 'कीर्तनां'ची लेखमालाही (*सत्यकथा*) इथे नोंदविली पाहिजे. विश्वसाहित्य व भारतीय साहित्ये यांतील अभिजात साहित्यकृती व साहित्यिक यांचे कायमचे आव्हान उपयोजित समीक्षेला असते.

### ११. समीक्षकांची समीक्षा

समीक्षक हादेखील साहित्यिकाप्रमाणेच उपयोजित समीक्षेचा विषय झालेला आहे. ही समीक्षक-समीक्षा कधी स्वतंत्र लेखरूपाने व बहुधा अंशतः प्रस्तावनारूपाने केल्याचे दिसते. वा.ल. कुलकर्णी (*वामन मल्हार : वाङ्मयदर्शन*, १९४४, *न.चिं. केळकर : वाङ्मयदर्शन* १९७३, *श्रीपाद कृष्ण : वाङ्मयदर्शन*, १९५९), गो.म. कुलकर्णी (*मराठी समीक्षेची वाटचाल*, १९९८), म.द. हातकणंगलेकर (*साहित्यविवेक*, १९९७ व प्रस्तावना - *हिमवंतीची सरोवरे* - १९९६), वसंत पाटणकर (प्रस्तावना - *अक्षरांचा श्रम केला* - २०००), सुधीर रसाळ (प्रस्तावना - *गंगाधर गाडगीळ, निवडक समीक्षा* - प्रस्तावना, १९९६), निशिकांत ठकार (*स्फटिकदिवे* - २००० - प्रस्तावना).

### १२. इतर काही लेखनप्रकार

उपयोजित समीक्षेची काही रंगरूपे इतरही काही लेखनप्रकारांतून प्रकट झालेली आहेत. स्थूलपणे हे प्रकार पुढीलप्रमाणे सांगता येतील :

१. तात्त्विक समीक्षालेखनातूनही काही साहित्यकृतींचा व साहित्यिकांचा उदाहरणांपुरता तरी वेध घेण्यात येतो. त्यातून समीक्षेच्या मर्मदृष्टी प्राप्त होऊ शकतात.

२. साहित्येतिहासाच्या ग्रंथांमधूनही अनेकदा समीक्षापर विवेचन करण्यात येते. विशेषतः प्राचीन मराठीच्या इतिहास-कारांनी आपापल्या इतिहासग्रंथांतून या प्रकारची समीक्षा आवर्जून केली आहे.

३. शुद्ध संशोधन साहित्याच्या क्षेत्रातही त्या त्या संशोधकाने आपल्या नवशोधित साहित्याची समीक्षा करण्याची जबाबदारी पार पाडल्याचे दिसून येते.

४. साहित्याभ्यासाची काही रूपकात्मक प्रतिमाने (मॉडेल्स) सिद्ध करून त्यांच्या स्पष्टीकरणासाठी निवडक साहित्यकृतींची समीक्षा करण्याचाही प्रयत्न मराठीत झालेला आहे. उदा., *भावपेशी* (१९९५, अरुण गद्रे) व *पर्यावरणीय प्रबोधन व साहित्य* (१९९५, रा.ग. जाधव) ही पुस्तके.

५. निर्मितिप्रक्रियेच्या अंगाने स्वतः निर्मात्यानेच केलेली आपल्या साहित्यकृतीची विवेचने ही उपयोजित समीक्षेला काही मर्मदृष्टी देऊ शकतात. या दृष्टीने महाराष्ट्र साहित्य पत्रिकेने आपल्या दिवाळी अंकातून (१९९०, १९९६) कथा, कादंबरी या प्रकारांवर लेख प्रसिद्ध केले आहेत. श्री.ना. पेंडसे यांचे स्वतःच्या साहित्यावरील पुस्तकही उल्लेखनीय आहे.

६. तौलनिक साहित्य, शैलीवैज्ञानिक समीक्षा, आदि-बंधात्मक समीक्षा या पद्धतींप्रमाणेच वाचक- प्रतिसाद-सिद्धान्त याचाही अवलंब अंशतः करणारा एक प्रयत्न मराठीत झालेला









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. तो म्हणजे, *'आहे मनोहर तरी'* - *वाचन आणि विवेचन* (२०००, संपा. : विजया राजाध्यक्ष - श्री. पु. भागवत)

७. *प्रतिष्ठान* मासिकाने मराठी कादंबऱ्या व नाटके यासंबंधीच्या समीक्षा विशेषांकांचे प्रकाशन केले होते. इतरही नियतकालिकांचे असे प्रयत्न झाले आहेत.

**४) एकोणिसाव्या शतकाचा अनुबंध**

साहित्य आणि समीक्षा यांच्या परंपरांत सेंद्रिय सलगता असते. विसाव्या शतकातील एकूणच मराठी समीक्षेचे काहीएका स्वरूपाचे नाते आधीच्या एकोणिसाव्या शतकातील मराठी समीक्षेच्या आद्यपर्वाशी आहे. हा अनुबंध इथे प्रस्तुत नाही; पण त्याचे भान राखणे अत्यावश्यक आहे, एवढे नमूद केलेच पाहिजे.

एकोणिसाव्या शतकातील मराठी समीक्षाप्रवृत्ती व प्रेरणा कशा होत्या व त्यांमधून तात्त्विक व उपयोजित समीक्षालेखन कसे घडत होते, याची चांगली चिकित्सा रा.भा. पाटणकरांनी आपल्या *अपूर्ण क्रांती* या पुस्तकातील तिसऱ्या भागात केली आहे. या चिकित्सेला वसाहतकालीन प्रभावमीमांसेच्या वादग्रस्त व्यूहाची पार्श्वभूमी आहे हे खरे; पण तरीदेखील अनुबंधाच्या विषयात ती मार्मिक दृष्टी देणारी आहे. इतरही काही अभ्यासकांनी या अनुबंधाचा मागोवा घेतलेला आहे व तोही अभ्यसनीय आहे. उदा., गो.म. कुलकर्णींचे *मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी* हे पुस्तक. मराठी वाङ्मयेतिहास तसेच व्यक्तिवाङ्मयपर ग्रंथ यांतूनही हा पूर्वशतकीय अनुबंध कमीअधिक प्रमाणात विशद करण्यात आला आहे.

**५) विसाव्या शतकातील मराठी उपयोजित समीक्षा : काही उपलब्ध आधार :**

आधुनिक मराठी साहित्येतिहास-ग्रंथांतून मराठी समीक्षेवरील स्वतंत्र प्रकरणे दिलेली आहेत. मात्र या प्रकरणांतून उपयोजित समीक्षेची समालोचने अगदी काटेकोरपणाने केलेली दिसत नाहीत. तात्त्विक समीक्षा स्वतंत्रपणे देऊन उर्वरित सर्व समीक्षा वेगवेगळ्या उपशीर्षकांखाली विचारात घेतलेली आहे. अर्थात समीक्षेतील विभेदीकरणाची प्रक्रिया ही हळूहळू होत राहते. विसाव्या शतकात उत्तरोत्तर उपयोजित समीक्षेची स्वतंत्र ओळख दृढ होत गेली व ती स्वतंत्रपणे दखलपात्र ठरली.

प्रस्तुत उपयोजित समीक्षाशतकाचा मागोवा घेण्यासाठी काही संदर्भसाहित्य उपलब्ध आहे. ते पुढीलप्रमाणे :

१) *निवडक मराठी समीक्षा* (१९९९, संपा., गो.मा. पवार/म.द. हातकणंगलेकर)

या संपादनात एकोणिसाव्या व विसाव्या शतकातील निवडक समीक्षालेख असून त्यांची एकूण संख्या २९ आहे. या २९ लेखांपैकी फक्त सहा लेख उपयोजित समीक्षेचे आहेत. या प्रमाणावरून अंदाज करावयाचा तर चांगली उपयोजित समीक्षा ही एकूण मराठी समीक्षेच्या तुलनेत फक्त वीस टक्के आहे, असे म्हणता येईल. हे प्रमाण मोठे सूचक आहे, हे वेगळे सांगावयास नको.

२) *उपयोजित साहित्य-समीक्षा* - अविनाश सप्रे : [संदर्भ - मराठी साहित्य : प्रेरणा व स्वरूप (१९५०-१९७५), संपा., गो.मा. पवार; म.द. हातकणंगलेकर, १९८६, पृष्ठे - ३७८-४२८].

हा प्रदीर्घ लेख विश्लेषक समीक्षेचा आविष्कार आहे. १९५० ते १९७५ या कालखंडाच्या साहित्यविचारातील प्रभावी भूमिकांची, त्यांतील वादसंवादांची, नव्या वळणांची व नव्या साहित्यप्रवाहांची एक चैतन्यपूर्ण पार्श्वभूमी व परामर्श या, समीक्षेची समीक्षा करणाऱ्या लेखात आहे. सूक्ष्म चिकित्सक वाचन-विश्लेषण असणारी ही मीमांसा उपयोजित समीक्षेसंबंधी मर्मदृष्टी देणारी आहे.

सप्रे यांच्या विवेचनात उपयोजित समीक्षेतील प्रवृत्ती व प्रेरणा हेच केंद्रीभूत सूत्र असल्याने त्यांनी १९५० ते १९७५ या कालखंडातील उपयोजित समीक्षेची वर्गवारी पुढीलप्रमाणे केली आहे :

१) प्रमेयदर्शी समीक्षा २) परिणामदर्शी समीक्षा ३) निर्माणक समीक्षा ४) तत्त्वदर्शी समीक्षा ५) आस्वादक समीक्षा ६) शास्त्रीय नवजीवनवादी समीक्षा.

ही वर्गवारी समीक्षकाचा रोख, त्याचा गौणप्रधानविवेक व त्याच्या मांडणीतील शोधाचे स्वरूप या निकषांवर भर देऊन केली आहे, असे लेखकाचे म्हणणे आहे.

लेखाच्या पुढील विवेचनात कलावादी भूमिका, जीवनवादी भूमिका, आध्यात्मिक जीवनवाद, सर्जनशील आत्मचिंतन, आस्वादक समीक्षा, शास्त्रीय नवजीवनवाद या उपशीर्षकांखाली प्राधान्याने त्या त्या प्रकारातील उपयोजित समीक्षेची सूक्ष्मपणे मीमांसा केली आहे.

सप्रे यांचा निष्कर्ष असा आहे की, मराठीतील या विशिष्ट कालखंडातील (१९५०-७५) उपयोजित समीक्षेचे अपेक्षित कार्य प्रचंड प्रमाणात अपयशी झाले आहे.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अविचल, प्रखर आत्मनिष्ठा, आपल्या साहित्यप्रतीतीसंबंधी अर्थपूर्ण व मूल्यवान व्यवस्था लावण्याची क्षमता, अस्सल सर्जनाला जाणून त्याला प्रोत्साहित करण्याची जबाबदारी यांसारख्या गुणवत्तेची संपादणी केल्याखेरीज उपयोजित समीक्षकाला आपली नैतिक जबाबदारी यशस्वीपणे पार पाडता येणार नाही, असेही या समीक्षकाने म्हटले आहे.

सप्रे यांची मांडणी सर्वांना सर्वप्रकारे मान्य होईल, असे नाही. त्यांच्या निष्कर्षाबद्दलही हे खरे आहे. रा.भा. पाटणकर जिला 'विदग्ध' साहित्यसमीक्षा म्हणतात, तशी विदग्ध दर्जाची उपयोजित समीक्षा हा बहुधा कायमचा दुरावत जाणारा ध्रुवतारा असतो. मात्र प्रस्तुत उपयोजित समीक्षाशतकाला याचे नेमके भान आलेले आहे, असे सप्रे यांच्या मांडणीनंतर वीसेक वर्षांनी आपणांस म्हणता येईल, असे मला वाटते.

३) *उपयोजित समीक्षा : वसंत आबाजी डहाके* (मुंबई विद्यापीठ प्रकाशन)

हा एक तिसरा आधार; तथापि खूप प्रयत्न करूनही हे पुस्तक मला तरी वेळेवर मिळू शकले नाही. अभ्यासकांनी ते पाहावे (आणि मीदेखील). एवढे सांगण्यासाठी हा उल्लेख केला.

**६) विसावे समीक्षाशतक : स्थूल ऐतिहासिक परिप्रेक्ष्य**

विसाव्या शतकातील उपयोजित समीक्षा हा विषय एका बाजूने एक ऐतिहासिक एकक आहे. म्हणून ऐतिहासिक दृष्टीने या उपयोजित समीक्षाशतकाबद्दल अर्थपूर्ण असे काय बोलता येईल ते पाहिले पाहिजे.

एक म्हणजे या शतकातील साहित्यनिर्मितीशी उपयोजित समीक्षेने समाधानकारक अनुसंधान राखले आहे किंवा नाही हा एक प्रश्न.

दुसरे म्हणजे विसाव्या शतकात साहित्यविषयक अभिरुची, जाणीव, संकल्पना, मूल्ये, समीक्षापद्धती इत्यादीत जी वाढ व जो काही विकास झाला, त्यातून आधुनिकपूर्व मराठी साहित्यकृती, साहित्यिक वगैरेंबाबत उपयोजित समीक्षा कितपत झाली व ती समाधानकारक आहे किंवा काय, हा दुसरा एक प्रश्न.

तिसरा विचार विसाव्या शतकातील नवप्रवर्तक साहित्याच्या संदर्भातील. या शतकात मराठी साहित्यात काहीएक नवप्रवर्तन झाले, नवनवीन प्रयोग करण्यात आले, नवे साहित्यप्रवाह निर्माण झाले, कलाविषयक व जीवनविषयक जाणिवांचे परस्परसंबद्ध व्यूह रचण्यात आले, परभाषिक साहित्यप्रभावांचे उदयास्त होत राहिले. नवता, प्रयोगशीलता, जीवनदृष्टीतील स्थित्यंतरे इत्यादींची जी जी रंगरूपे साहित्यात उमटली, त्यांची आवाहने या शतकातील उपयोजित समीक्षेने ओळखली काय व ती स्वीकारून त्यांची नेटकी अभिव्यक्ती करण्याचे कार्य पार पाडले किंवा काय, हा एक प्रश्न.

या तीनही प्रश्नांच्या मध्ये आणखीही काही ऐतिहासिक दृष्टीने अगत्याच्या प्रश्नांची भर घालता येईल. मी फक्त ईषत्दर्शन घडविण्यापुरताच हा विषय इथे घेतला आहे.

या संदर्भात थोडक्यात काही निरीक्षणे नोंदवता येतील. या शतकाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन ऐतिहासिक कालखंड विचारात घेता येतील. साहित्यविषयक अभिरुची, जाणिवा, संकल्पना, तत्त्वे, समीक्षेचे स्वरूप-तत्त्वे-पद्धती इत्यादींबाबत या शतकाचा पूर्वार्ध व उत्तरार्ध यांमध्ये गुणात्मक फरक पडला, असे अर्थातच प्राधान्यविवेकाने म्हणता येईल. परिणामतः पूर्वार्धातील उपयोजित समीक्षा ही प्राधान्याने बहिर्मुख, साधारणपणे पूर्वप्राप्त अशा संस्कृत-इंग्रजी तत्त्व-नियमांना प्रामाण्य देणारी, लेखनतंत्राला मानणारी आणि नैतिक-सामाजिक आशयाला वाङ्मयीन अभिव्यक्तीत जे रास्त स्थान असते, त्याचा नेमका विवेक दुर्लक्षित करणारी अशी प्राधान्याने होती. याला अपवाद आहेतच हेही खरे. वाङ्मयीन सर्जनाची व्यामिश्रता पुरेपूर न ओळखता त्याचे सोपे सुबोध सुलभीकरण त्या पूर्वार्धातील उपयोजित समीक्षेतून होत राहिल्याचे दिसते. लेखक व लेखनविषय हेच त्या समीक्षेचे मुख्य लक्ष्य होते, असेही म्हणता येईल. म्हणून या दोहोंच्या सापेक्षतेने संभवणारे अनेक विषय वा विषयांतरे त्या समीक्षेत येत राहिली. मात्र विकसनशील साहित्यसमीक्षा-परंपरांत या प्रकारचा एक ऐतिहासिक टप्पा अटळ असतो, हेही इथे लक्षात घेतले पाहिजे. या पूर्वार्धात मराठी कविता, कथा, कादंबरी, नाटक या प्रकारांत काहीएक नवे घडत होते. तथापि, एक काव्यसमीक्षा काहीशी अपवाद करून बाकी सर्व उपयोजित समीक्षा नवतेचे, प्रयोगशीलतेचे आव्हान पेलू शकली नाही, असे म्हटले पाहिजे. प्राचीन मराठी साहित्य व साहित्यिक यांचीही फारशी दखल या पूर्वार्ध-समीक्षेने घेतली नाही. कदाचित पुरेसे साहित्येतिहास व प्राचीन साहित्य त्या कालखंडात उपलब्ध नव्हते असे म्हणता येईल. महानुभाव साहित्याची घेतलेली दखल मात्र स्पृहणीय अपवाद म्हणता येईल.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उत्तरार्धात मात्र उपयोजित समीक्षा अधिक तत्पर, दक्ष व डोळस होत गेल्याचे दिसते. साहित्याच्या प्रकृतीची, रंगरूपांची, त्यांतील नवतेची व प्रयोगशीलतेची अभिज्ञता अधिक नेमकेपणाने या समीक्षेत प्रकटली. प्राधान्याने रूपवादी भूमिकेचा पुरस्कार या समीक्षेने एका ऐतिहासिक भानाच्या व गरजेच्या अटळ जाणिवेतून केला. मर्ढेकर, गाडगीळ, कुलकर्णी व माधव आचवल यांसारख्या समीक्षकांनी उपयोजित समीक्षेला एक उद्‌बोधक व अर्थपूर्ण दिशा दिली. साहित्यातील रूपसंकल्पनेचा विस्तार व विकास तत्कालीन कलावादी समीक्षेने घडवून आणला.

साठोत्तरी कालखंडात नवे दलित, ग्रामीण, श्रमजीवीचे असे साहित्यप्रवाह मराठीत उदयास आले. याच कालखंडाच्या आसपास साहित्यविषयक नवे सांस्कृतिक भान हळूहळू प्रकट होत गेले. मात्र या जीवनवादी प्रवाहातील साहित्य व साहित्यिक यांची पुरेशी समर्थ उपयोजित समीक्षा मात्र निर्माण झाली नाही. जीवनवादी विशिष्ट प्रणाल्यांचे विवेचन म्हणजे उपयोजित समीक्षा असे एक समीक्षीय सुलभीकरण या कालखंडात प्रभावी ठरले. अर्थात हेही प्राधान्यविवेकाने लक्षात घ्यावयाचे आहे. रूपवादप्रधान समीक्षेचा समुचित विवेक या परिवर्तनवादी समीक्षेने पुरेसा आत्मसात केला नाही. रूपवादी समीक्षेचा एकांगीपणा वा एकाक्षता नाकारणे ठीक म्हटले, तर तिचे डोळसपणही त्याबरोबरच नाकारले गेले. गाडगीळ-आचवलांसारखे समीक्षक या जीवनवादी, परिवर्तनवादी प्रवाहांना लाभले नाहीत. त्यांच्यासारखे म्हणजे उपयोजित समीक्षेची आवाहने व जबाबदारी निष्ठेने स्वीकारणारे व पार पाडणारे.

१९८० नंतरच्या कालखंडाने या शतकातील आपला वारसा नीटपणे ओळखून उपयोजित समीक्षेकडे वळले पाहिजे हे उघडच आहे. साहित्यसमीक्षेत रूपसंकल्पना केंद्रीभूत आहे; कारण साहित्य ही अखेर एक कला आहे; रूप ही विलक्षण गुंतागुंतीची बाब आहे, या गुंतागुंतीतील विविध पदर एकाच वेळी कलावादी व जीवनवादी रंगरूपांचे असतात, कलावादी संकल्पना व जीवननिष्ठ नैतिकतावादी संकल्पना यांची नेमकी समज इष्ट असते, यांसारख्या गोष्टींचे भान १९८० नंतरच्या काही समीक्षकांमध्ये निश्चितच दिसून येते. एकाक्ष कलावाद व एकाक्ष जीवनवाद यांच्या मर्यादा त्यांच्या समीक्षेने ओळखल्याचे दिसते. या दृष्टीने पाहता गंगाधर पाटील (*समीक्षेची नवी रूपे* १९८१), गो.मा. पवार (*साहित्यमूल्य आणि अभिरुची* १९९४), सुधीर रसाळ (*काही मराठी कवी : जाणिवा आणि शैली* १९९६), भालचंद्र नेमाडे (*टीकास्वयंवर* १९९०), म.द. हातकणंगलेकर (*साहित्यविवेक* १९९७, *साहित्यातील अधोरेखिते*), वसंत आबाजी डहाके (*कवितेविषयी* १९९९), विनय हर्डीकर (*कारुण्योपनिषद्* १९९८), सु.रा. चुनेकर (*अंतरंग* १९९६), प्रकाश देशपांडे, केजकर (*मराठी कविता : नवी वळणे* १९९४); नागनाथ कोत्तापल्ले (*आधुनिक मराठी कविता : एक दृष्टिक्षेप* १९९९), प्रभाकर बागले (*निमित्ताच्या निमित्ताने* १९९८), यशवंत मनोहर (*स्वाद आणि चिकित्सा* १९७८), सदानंद मोरे (*त्रयोदशी*), सरोजिनी वैद्य (*माती आणि मूर्ती*), विलास खोले, (*चौकट, शांताराम कथा, राजेंद्र बनहट्टी : निवडक दीर्घकथा* इ.) इत्यादी समीक्षकांची उपयोजित समीक्षा हा मोठा समाधानकारक दिलासा आहे. या शतकाच्या सांगतेच्या टप्प्यावर एवढेच म्हणता येईल की, मराठी उपयोजित समीक्षेत महानतेची बीजे आहेत; मात्र ती रुजून वाढणे-बहरणे हे उद्याचे आश्वासन आहे. या संदर्भात दत्ता भगत यांनी नामदेव कांबळे यांच्या कादंबरी-त्रयाची केलेली समीक्षा ('राघववेळ, ऊनसावली आणि सांजरंग : आकलनाची एक वेगळी वाट' – *प्रतिष्ठान* – नोव्हें.-डिसें. १९९८) खास उल्लेखनीय आहे. दलित-दलितेतर आणि कलावाद-जीवनवाद अशा द्वैतांच्या पलीकडे जाऊन केलेली ही एक नमुनेदार कादंबरी-समीक्षा आहे. याचबरोबर रूपवादी, कलावादी समीक्षेचा एक अप्रतिम नमुना म्हणून रमेश तेंडुलकरांची बालकवी-समीक्षा ('*बालकवींची कविता : तीन संदर्भ* १९९९) उल्लेखनीय आहे. या प्रकारच्या समीक्षा कलावादजीवनवादांच्या भेदभिंती ओलांडून जाण्यास वाचकाला प्रवृत्त करतात. चांगल्या साहित्यकृतीप्रमाणेच चांगली उपयोजित समीक्षा स्वतःचे एक स्वयंपूर्ण मूल्य सिद्ध करत असते व ते मूल्य कलावाद-जीवनवाद या द्वैताच्या पैल असते.

जुन्या साहित्याची व साहित्यिकांची महत्त्वाची आधुनिक समीक्षा या उत्तरार्धात पुढे आली. दिलीप चित्रे (*पुन्हा तुकाराम* १९९०) तसेच सदानंद मोरे (*तुकाराम-दर्शन* १९९६) यांची समीक्षा या संदर्भात आठवते.

या शतकाच्या उत्तरार्धातील उपयोजित मराठी समीक्षेची गुणात्मक वाढ करणारी काही ठळक व काही धूसर कारणेही आहेत. मराठीतील सौंदर्यशास्त्रीय मांडणीचा समृद्ध अवतार, त्यामुळे उपयोजित समीक्षेतील अध्याहृत तत्त्वे, संकल्पना,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सिद्धान्त यासंबंधी निर्माण झालेली स्वच्छ जाणीव, नव्या प्रयोगशील व प्रभावी साहित्यप्रवाहांनी समीक्षेपुढे उभी केलेली आवाहने व आव्हाने पेलू शकणारी समर्थ समीक्षकांची उपस्थिती, वाङ्मयीन नियतकालिकांनी स्वीकारलेली समीक्षाविषयक गांभीर्याची व जबाबदारीची भूमिका, प्रस्थापित साहित्यसमीक्षेविरुद्ध उफाळून आलेली मातब्बर प्रतिक्रिया आणि एकूणच समीक्षाव्यवहाराची उत्तरोत्तर वाढत गेलेली सामाजिक दखलपात्रता इत्यादी कारणे ठळकपणे लक्षात येतात. मात्र भारतीय स्वातंत्र्याच्या ऐतिहासिक महत्त्वाच्या टप्प्यावर रूपवादी साहित्य व समीक्षेचा झालेला प्रभावी उदय ही बाब खूपच गुंतागुंतीची आहे व सामाजिक-सांस्कृतिक स्थित्यंतराशी ती तशाच व्यामिश्र नात्याने निगडित झालेली आहे. उत्तरार्धातील उपयोजित समीक्षेतील गुणात्मक चढउतार हे केवळ वाङ्मयीन संदर्भात समजावून घेता येतील, असे वाटत नाही. वाङ्मयबाह्य सामाजिक-सांस्कृतिक संदर्भातही ते जाणून घ्यावे लागतील, असे वाटते. दलित साहित्यसमीक्षेचे उदाहरण या संदर्भात मोठे अभ्यसनीय ठरेल, असे वाटते.

### ७) आस्वादक समीक्षेचा वाद

या शतकाच्या उत्तरार्धात आस्वादक समीक्षेसंबंधी एक महत्त्वाची चर्चा उपस्थित झाली. एका परीने ही चर्चा म्हणजे एका उपयोजित समीक्षाप्रवाहाची तत्त्वलक्ष्यी समीक्षा म्हणता येईल. १९५० नंतरच्या कालखंडातील आस्वादक मराठी समीक्षेतील काही अपप्रवृत्ती व बरेचसे असमाधान या चर्चेच्या मुळाशी होते. या चर्चेचे प्रवर्तक रा.भा. पाटणकर हे होत. दुसऱ्या बाजूला प्रामुख्याने गंगाधर गाडगीळ. इतरही समीक्षकांनी या चर्चेत प्रत्यक्षा-प्रत्यक्षपणे भाग घेतला आहे. अर्थात या चर्चेचा सविस्तर परामर्श इथे घेणे शक्य नाही; मात्र ही चर्चा बारकाईने जाणून घेतल्याखेरीज प्रस्तुत समीक्षाशतकाचे यथार्थ आकलन होणार नाही, हेही इथे सांगितले पाहिजे.

या महत्त्वाच्या चर्चेचे मला समजलेले स्वरूप थोडक्यात दिग्दर्शित करण्याचा माझा प्रयत्न आहे. यासाठी संदर्भसाहित्य आहे ते पुढीलप्रमाणे :

अ) रा.भा. पाटणकरांची पुढील पुस्तके, विशेषतः त्यांतील प्रस्तावना –
 १. *कमल देसाई यांचे कथाविश्व* - १९८४
 २. *मुक्तिबोधांचे साहित्य* - १९८६
 ३. *कथाकार शांताराम* - १९८८

आ) *संवाद* या पुस्तकातील - गंगाधर गाडगीळांची मुलाखत

इ) गंगाधर गाडगीळांचे पुढील लेख व *खडक आणि पाणी* तथा इतर समीक्षा
 १. प्रस्तावना – *आजकालचे साहित्यिक* – १९८०
 २. 'मराठी समीक्षा : काही प्रश्न' – *पाण्यावरची अक्षरे* १९९०, पृष्ठे ४५-५०

ई) सुधीर रसाळ यांची प्रस्तावना : *गंगाधर गाडगीळ : निवडक समीक्षा*, १९९६

उ) म.द. हातकणंगलेकरांचा 'आस्वादक समीक्षेची किंचित कैफियत' – *साहित्यविवेक* – १९९७; पृष्ठे ९९-१०४.

आस्वादक समीक्षेसंबंधीची ही चर्चा खूपच परिश्रमपूर्वक व परिशीलनपूर्वक समजावून घ्यावी लागेल व माझी तशी तयारी नाही. काही स्थूल निरीक्षणे फक्त मी इथे नोंदवू शकतो :

१) "सर्व प्रकारची समीक्षा यथार्थ ज्ञान देण्यासाठी लिहिली जाते", ही पाटणकरांची भूमिका वा गृहीतक आहे. आस्वादक समीक्षा या दृष्टीने कमी पडते, असे त्यांना वाटते.

२) लेखकलक्ष्यी वळणाने आस्वादक समीक्षा अर्थशून्य व अप्रस्तुत अशा चरित्रात्मक, सामाजिक- सांस्कृतिक व विचाप्रणालीय तपशीलांनी भरकटली जाते.

३) वाचकलक्ष्यी कलाने ती साहित्यकृतिनिरपेक्ष स्वैर चिंतनात व आत्माविष्कारात रममाण होते.

४) साहित्यकृतीचा रसिक-प्रत्यय संकल्पनानिरपेक्ष नसतो. म्हणून वर्गीकरण व संकल्पना समीक्षेत आवश्यक असतात.

५) समीक्षाविधान हे कधीच स्वायत्त सौंदर्यासंबंधी नसते.

६) रसिकानुभवाचे विश्लेषण करताना पुढील प्रतिमाने लवचिकपणे वापरता येतात; पण याकडे आस्वादक समीक्षा पाठ फिरवते : i) गॅलीचे स्वभावतः वादग्रस्त संकल्पनांचे प्रतिमान; ii) हेगेलप्रणीत विशिष्टसंपृक्त सामान्याचे प्रतिमान; iii) विटगिन्स्टाइनचे कुलसाम्याचे प्रतिमान.

७) गाडगीळांची प्रत्यक्षातील आस्वादक समीक्षा मात्र त्यांच्या सैद्धान्तिक भूमिकेपेक्षा वेगळी व समाधानकारक ठरते, असा पाटणकरांचा अभिप्राय आहे.

८) साहित्यकृतीच्या अनुभवातील संकल्पनांचे स्थान, या संकल्पनांची अनुभवाच्या पूर्वोत्तर व प्रत्यक्ष काळातील उपस्थिती हे आस्वादक समीक्षक व त्यांचे विरोधक यांतील मुख्य संघर्षस्थान आहे, असे पाटणकर म्हणतात.

९) गाडगीळांच्या आस्वादक समीक्षेमागील भूमिकेचे व्यवस्थित विवेचन सुधीर रसाळांनी केले आहे (*गंगाधर*






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

*गाडगीळ : निवडक समीक्षा* १९९६, पृष्ठे २०-२६) ते जिज्ञासूंनी पाहावे, एवढेच इथे सांगणे शक्य आहे.

१०) आस्वादाची चिकित्सक भूमिका इष्ट आहे; विच्छेदनाने, शब्दच्छलाने ती नकारात्मक व शुष्क होण्याचा संभव असतो, भावविवश आस्वाद ठरविण्याचे निकष मांडले पाहिजेत आणि समीक्षेची निरामयता ही वादग्रस्त संकल्पना आहे, अशी कैफियत हातकणंगलेकर यांनी सादर केली आहे.

पाटणकरांनी 'आस्वाद' या शब्दासंबंधी (टीपेत) केलेले विवेचन उद्‌बोधक आहे (*कमल देसाई यांचे कथाविश्व* १९८४, पृष्ठ तीस-एकतीस). या शब्दाला धनस्वरूपी मूल्यार्थ असून वर्णनपर अशा त्याच्या वेगवेगळ्या अर्थांपैकी भावनात्मक चर्वणेसारख्या अर्थालाच समीक्षेत अतिरिक्त महत्त्व आले आहे, असे ते म्हणतात. विश्लेषणादी प्रक्रिया, मूल्यमापन अंतर्भूत असलेले आणि त्यांना भावानुभव घेण्यापेक्षाही अधिक महत्त्व असलेले वाचन म्हणजे 'आस्वाद' असा पाटणकरांचा अर्थ आहे.

पाटणकरांनी उपस्थित केलेल्या चर्चेमुळे व त्यांच्या या संदर्भातील चिकित्सेमुळे मराठी आस्वादक वा उपयोजित समीक्षेला जणू दुहेरी भिंगांचा सूक्ष्मदर्शक लाभला, असे म्हणता येईल. साहित्यानुभवातील निकटचे व दूरवरचे पाहणे व या दोन्ही पाहण्यांचा एखाद्या अभ्युपगमाच्या आधाराने विश्लिष्ट-संश्लिष्ट व्यूह साधणे अशी ही पाटणकरी भूमिका आहे. या प्रकारच्या समीक्षेला ते 'विदग्ध' समीक्षा असे नाव सुचवितात.

पाटणकरांच्या भूमिकेचा अपेक्षित प्रभाव मराठी समीक्षेवर पडला नाही, हे दुर्दैवाने खरे असले, तरी विसाव्या शतकातील मराठी समीक्षेत त्यांनी प्रेरित व पुरस्कृत केलेली उपयोजित समीक्षेची समीक्षा ऐतिहासिक महत्त्वाची मानावी लागेल. पाटणकरी भूमिकेला कायमची प्रस्तुतता आहे.

### ८) जीवनसन्मुख नैतिकतावादी भूमिका

विसाव्या शतकातील उपयोजित मराठी समीक्षेच्या संदर्भात आणखी एका ऐतिहासिक महत्त्वाच्या घटनेचा उल्लेख केला पाहिजे. तो म्हणजे 'मराठी साहित्य-प्रेरणा व स्वरूप - १९५० ते १९७५' या विषयावर कोल्हापूर येथे झालेला परिसंवाद (२२-२५ ऑगस्ट १९८०). या परिसंवादाविषयी समग्र ग्रंथही त्याच नावाने प्रकाशित झालेला आहे (१९८६). हा परिसंवाद व त्यातील चर्चा यांसंबंधी या ग्रंथाच्या प्रस्तावनेत व्यक्त केलेले काही अभिप्राय असे :

१) "साहित्याकडे बघण्याचा जीवनसन्मुखतेचा, नैतिकतेला महत्त्व देणारा, सामाजिक वास्तवाचा पाठपुरावा करणारा दृष्टिकोण नेमाडे, जहागिरदार, चंद्रकांत पाटील यांच्या निबंधांतून (अनुक्रमे कादंबरी, ललित गद्य व लघुनियतकालिके यांवरील) सविस्तरपणे मांडला गेला; त्याप्रमाणे कलावादी दृष्टिकोण मात्र कुठल्या एका निबंधातून ठाशीवपणे मांडला गेला असे दिसत नाही. तो प्राधान्याने चर्चेतूनच पुढे आला." (पृ. पंधरा)

२) "जीवनसन्मुख नैतिकतावादी भूमिकेचा प्रभाव या परिसंवादात अधिक प्रमाणात जाणवला, असे वाटते". (पृ. दोन)

३) "नेमाडे यांनी कादंबरीवरील निबंधात वापरलेले आशयद्रव्य, आशयसूत्रे, भाषिक अवकाश, देशीयता हे पारिभाषिक शब्द आता समीक्षेच्या भाषेत वारंवार वापरले जाऊ लागले आहेत. त्यांनी कादंबरीची केलेली व्याख्याही गंभीरपणे विचारात घेतली जात आहे." (पृष्ठ सोळा)

४) "...चर्चा रोखठोक झाली, तिच्यात समन्वयाची भूमिका घेण्यात आली नाही. विचाराला चालना मिळू लागली आहे आणि समीक्षेला वेगळी दिशा लाभत आहे... परिवर्तनासाठी समन्वयाची भूमिका उपयोगी पडत नाही, याची जाणीव वाढते आहे असे दिसते." (पृ. सतरा-अठरा)

वरील अभिप्राय व ग्रंथनिविष्ट निबंध आणि चर्चा लक्षात घेतल्यास १९८०च्या आसपास मराठी उपयोजित समीक्षेला नवीन स्वरूप, तात्त्विक अधिष्ठान प्राप्त होत असल्याचे जाणवते. साहित्यकृती म्हणजे काय याविषयीचे व त्यातील घटकद्रव्यांचे नवे भान, असे या नव्या तात्त्विक वळणाचे स्थूल मानाने वर्णन करता येईल. जीवननिष्ठ मूल्यभान, त्यातील देशीयतेचा गाभा, शैलीसंबंधीचे एक समग्रतेचे भान इत्यादी विशेषांनी नेमाड्यांनी पुरस्कृत केलेली नवनैतिकतावादी सैद्धान्तिक भूमिका जीवनवादी समीक्षेचा एक पुढचा टप्पा गाठणारी आहे. या भूमिकेतून निर्माण होऊ लागलेली समीक्षेची परिभाषाही रूढ होऊ लागली आहे. विशेषतः कथात्म साहित्य, ललित गद्य, नाटक यांसारख्या प्रकारांतील साहित्यकृतींच्या बाबतीत या भूमिकेचे तात्त्विक उपयोजन उपयोजित समीक्षेच्या नव्या दिशेची ग्वाही देणारे ठरेल, असे वाटते





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अर्थात या प्रकारची नवनैतिकतावादी उपयोजित समीक्षा पुरेशा ताकदीने व वेगाने पुढे येणे महत्त्वाचे. अशा प्रकारच्या समीक्षेशी काहीएक नाते सांगणारी पूर्वकालीन समीक्षा दि.के. बेडेकर, द.ग. गोडसे, कुसुमावती देशपांडे, नरहर कुरुंदकर इत्यादींनी केलेली आहे हे खरेच. याच संदर्भात गो.मा. पवार यांनी केलेल्या *तुझे आहे तुजपाशी, रायगडाला जेव्हा जाग येते, गारंबीचा बापू, पाचोळा, ऑक्टोपस, बॅ. अनिरुद्ध धोपेश्वरकर* इत्यादी साहित्यकृतींवरील समीक्षणांतूनही या नव्या भूमिकेचे दर्शन घडते.

### ९) समारोपाची निरीक्षणे

विसाव्या शतकातील उपयोजित मराठी समीक्षेतून या समीक्षेच्या संदर्भातील काही सर्वसाधारण प्रश्न लक्षात येतात. त्यांचे सूत्ररूपाने दिग्दर्शन पुढीलप्रमाणे करता येईल :

#### १. *उपयोजित समीक्षेतील अंगभूत अंतःसंघर्ष*

या समीक्षेत आकलन, विश्लेषण, मूल्यमापन यांसारख्या प्रक्रियांच्या मुळाशी काहीएक तत्त्वे प्रच्छन्नपणे कार्यरत असतात. प्रत्यक्ष समीक्षेत मात्र ही तत्त्वचौकट अनेकदा बाजूला सारली जाते किंवा ती ओलांडली जाते. याचे एक महत्त्वाचे कारण मूळ साहित्यकृती हे असते. म्हणजे कलावादी मानली जाणारी समीक्षा जीवनवादी कल्पनांचा आधार घेऊ लागते; तथा जीवनवादी समजली जाणारी समीक्षा कलावादी कल्पनांचा वापर करू लागते. तात्त्विक भूमिका व समीक्षेतील तिचे प्रकटाप्रकट उपयोजन यांतील अतराय किंवा ताण हा या समीक्षेचा अंगभूत अंतःसंघर्ष आहे. त्याचे निरसन करणे कोणत्याही वाङ्मयीन तात्त्विक समीक्षेला शक्य होत नाही.

मात्र प्रत्यक्ष समीक्षेत होणारी उपयोजित प्रणालीची या प्रकारची अडवणूक ही सूक्ष्म चिकित्सेचा विषय झाल्यास एकूणच वाङ्मयविषयक व समीक्षाविषयक प्रणाल्यांचे व पद्धतींचे परिष्करण करणे शक्य होईल, असे वाटते. पाटणकरांच्या द्विध्रुवात्मकतेच्या सिद्धान्तामधून या प्रश्नाबाबत काहीएक मार्गदर्शन होऊ शकते. नेमाड्यांचा नवनैतिकतेचा सिद्धान्त पुरेसा विशद झालेला नसल्याने या संदर्भात त्यासंबंधी काही सांगणे अकाली ठरेल.

चांगल्या अर्थाने हटवादी असणाऱ्या साहित्यकृतींच्या मासोळ्यांना समर्पक बहुनिकषीय समीक्षेच्या जाळ्यात पकडणेही शक्य असते. या दृष्टीने संभवणाऱ्या प्रयत्नांची काही उदाहरणे म.वा. धोंड, गो.म. कुलकर्णी, हातकणंगलेकर, पाटणकर आदींच्या काही लेखनांतून गवसतात.

#### २. *निवडीचा प्रश्न*

उपयोजित समीक्षेत समीक्षकाच्या दृष्टीने स्वभावतःच अनुकूल-प्रतिकूल वाटणाऱ्या साहित्यकृतींची निवड असते. विशेषतः प्रतिकूल वाटणाऱ्या साहित्यकृतीची समीक्षा ही अनुकूल साहित्यकृतीच्या समीक्षेची गुणवत्ता अनेकदा प्राप्त करून घेऊ शकत नाही, असे दिसते. (उदा., गाडगीळांची जी.ए. कुलकर्णींच्या कथांची समीक्षा – *आजकालचे साहित्यिक* १९८०) ही परिस्थिती सार्वत्रिक मानली, तर विदग्ध समीक्षा-वृत्तीचा संकोच होतो किंवा काय, अशी शंका येत राहते. नामवंत मराठी समीक्षकांनी अल्प अपवाद वगळता दलित साहित्यकृतींची विदग्ध समीक्षा केलेली नाही, हेही इथे नमूद केले पाहिजे. याचा एक अर्थ असा की, उपयोजित समीक्षेची प्रेरणा केवळ रसिकता एवढीच एक नसावी. त्याचप्रमाणे साहित्यकृतीच्या निवडीमागच्या अनुकूल-प्रतिकूलतेच्या कसोट्या याही निखळ रसिकतानिष्ठ नसाव्यात. उपयोजित समीक्षेची समीक्षा करताना कुठल्यातरी एका टप्प्यावर आपणांस साहित्यबाह्य संदर्भांचा आधार घेणे क्रमप्राप्त ठरते किंवा काय, हा प्रश्न आहे.

#### ३. *पंथीय समीक्षा*

उपयोजित समीक्षेतील एक प्रश्न पाटणकर म्हणतात त्याप्रमाणे 'पंथीय' (आंबेडकरवादी, मार्क्सवादी, हिंदुत्ववादी, गांधीवादी किंवा स्त्रीवादी) समीक्षेचा आहे. या पंथीय वा प्रणालीय समीक्षा अपुऱ्या ठरतात हे खरे आहे. हीच गोष्ट नवेनवे साहित्यसिद्धान्त व समीक्षाप्रणाल्या यांत गुंतून पडलेल्या समीक्षेबाबतही खरी आहे. यावरील उपाय म्हणजे या प्रणाल्यांच्या बाहेर पडून मानवी जीवनव्यवहारांना पायाभूत ठरणाऱ्या संकल्पनाव्यूहांचा परिचय करून घेणे व त्यांचा समुचित वापर करण्याचे कौशल्य संपादन करणे, असे पाटणकरांचे म्हणणे आहे. हा उपाय वाटतो तितका सोपा नाही, हे उघडच आहे. मराठीतील दलित, ग्रामीण, जनवादी, स्त्रीवादी यांसारख्या प्रवाहांतून साहित्यकृतींची विदग्ध समीक्षा निर्माण झाली नाही, हे या संदर्भात विचारार्ह ठरते. कदाचित अशा समीक्षेची गरज या प्रवाहांच्या अग्रक्रमात अगदी तळाशी असेल व तिचे काहीएक समर्थन करणेही शक्य आहे. मात्र या प्रवाहांची वाङ्मयीन वाढ-विकासाची प्रक्रिया विदग्ध समीक्षे-

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अभावी अडखळत आहे, हेही सांगितले पाहिजे. साहित्याच्या व साहित्यविचाराच्या क्षेत्रात व विशेषतः नवप्रवर्तनाच्या टप्प्यावर समीक्षेचे कार्य निर्णायक महत्त्वाचे असते, ही गोष्ट मराठीत नवसाहित्याच्या प्रभावी समीक्षेने व समीक्षकांनी दाखवून दिले आहे. साठोत्तरी कालखंडातील नवप्रवाहांच्या निर्मात्यांनी व पुरस्कर्त्यांनी नेमकी हीच गोष्ट कमालीची दुर्लक्षित केली असे म्हणावे लागेल.

### ४. *निकषांचा प्रश्न*

चांगल्या उपयोजित समीक्षेचे निकष कोणते, हे सांगणे म्हटले तर सोपे व म्हटले तर अवघड आहे. स्वतः समीक्षक, त्याचा वाचक यांचे परिपूर्ण समाधान करणारी समीक्षा चांगली असे म्हणता येईल. मात्र हा वस्तुनिष्ठ निकष नाही. साहित्यकृतीमधील जास्तीत जास्त घटिते सामावून घेणारी समीक्षा चांगली, असे पाटणकरांचा अनुवाद करून म्हणता येईल. साहित्यकृतीच्या रूपाची, आशयाची, सूचित जीवनार्थाची मर्मदृष्टी देणारी एक सर्जनशील निर्मिती समीक्षेत अपेक्षित असते. त्याचप्रमाणे ही निर्मिती विधानांच्या स्वरूपात व्यक्त झालेली असते. "समाधानाची ढेकर, असमाधानाची कळ किंवा लाडिक भावुक उद्‌गार, आत्मचरित्रपर ललित गद्य या स्वरूपात ती व्यक्त झालेली नसावी." – [इति पाटणकर]

तथापि चांगल्या समीक्षेचे अंतिम निकष या प्रकारे आकारिक असतात काय वा ते तसेच संभवतात काय, हा प्रश्न आहे. चांगली समीक्षा हीदेखील अखेरपक्षी एक हरण्याचा व हरलेला डाव असतो, असेही म्हटले जाते. कदाचित साहित्याच्या अंगभूत व परिवर्तनशील अशा जीवनसन्मुखतेतच या यशस्वी-अपयशी समीक्षेचे कारण दडलेले असावे.

### ५. *समीक्षाशतकाचे संचित व मागणे*

उपयोजित समीक्षा म्हणजे साहित्यक्षेत्रातील चैतन्याचे झरे. गेल्या मराठी समीक्षाशतकाने निर्माण केलेले संचित निर्विवादपणे महत्त्वाचे व मोलाचे आहे. हे संचित या शतकातील निर्मितीशी पुरेपूर समांतर वा समकक्ष आहे, असे जरी म्हणता आले नाही, तरी आहे त्या स्वरूपात त्याची उद्‌बोधकता मोठी आहे. त्याचप्रमाणे सगळ्याच चांगल्या मराठी साहित्यकृतींची, भारतीय साहित्यांतील व विश्वसाहित्यातील अभिजात साहित्यकृती व साहित्यिक यांची समाधानकारक दखल प्रस्तुत समीक्षाशतकाने घेतली आहे, असेही म्हणता येणार नाही. पण या अवस्थेची कारणेही असली पाहिजेत व आहेतही. आणि ती गुंतागुंतीचीही आहेत. कळीचा प्रश्न प्रेरकतेचा – मोटिव्हेशनचा – आहे व तो या शतकात उत्तरोत्तर अधिकाधिक अभावात्मक होत आहे. उपयोजित समीक्षेचे मुख्य व महत्त्वाचे योगदान संपन्न साहित्याभिरुचीचे संवर्धन हेच असते. यासाठी या समीक्षेचा स्वतंत्रपणे व सुनियोजित प्रकारे अभ्यास होत राहिला पाहिजे. हे काम वाङ्‌मयीन नियतकालिके, संस्था व शालेय तथा विद्यापीठीय मराठीचे अभ्यासक्रम इत्यादींनी केले पाहिजे. आणि यासाठी आवश्यक तेवढी अभ्यसनीय समीक्षा या शतकाने नक्कीच निर्माण केली आहे.

उपयोजित समीक्षा व या समीक्षेची समीक्षा या दोन्ही बाबतींत प्रस्तुत समीक्षाशतकाने मोठ्या प्रमाणात मर्मदृष्टी देणारे संचित जोडलेले आहे. हा वारसा उद्याची समीक्षा कितपत पचविते, कशा प्रकारे आत्मसात करते यावरच उद्याच्या समीक्षेची विकसनशील वाटचाल अवलंबून राहील.

●●

---

*(पान १५ वरून पुढे चालू...)*

३९. *विनय-पिटक*, हिंदी अनुवाद : राहुल सांकृत्यायन, १९२५, पा. २४६-२४८.
४०. दा.ध. कोसांबी, *ॲन इन्ट्रॉडक्शन टु द स्टडी ऑफ इंडियन हिस्टरी*, १९५६, पा. १५८.
४१. रा.भा. पाटणकर, उक्त, पा. ६५-६६.
४२. उक्त, पा. २८१.
४३. *बृहदारण्यकोपनिषद्* (सानुवाद शांकरशाष्यसहित), १.२.१.
४४. कार्ल मार्क्स, *थिअरीज ऑफ सरप्लस-व्हॅल्यू* (व्हॉल्यूम ४ ऑफ कॅपिटल), भा. १, पा. ७२.
४५. गव्हर्न्मेन्ट ऑफ इंडिया, *रिपोर्ट ऑफ द बॅकवर्ड क्लासेस कमिशन*, १९८०, पा. ३०.
४६. रा.भा. पाटणकर, उक्त, पा. २३१.
४७. उक्त, पा. २३८.
४८. उक्त, पा. ९८.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई



# तुकारामांच्या अभंगवाणीची अवतरणक्षमता

दिलीप धोंडगे

तुकोबांच्या अभंगवाणीचा विविध अंगांनी अभ्यास करणाऱ्या जुन्यानव्या प्रत्येक अभ्यासकाचे त्यांच्या अभंगवाणीतील अवतरणक्षम विधाने किंवा संपूर्ण अभंग यांच्यावर लक्ष केंद्रित होऊन ह्या अंगाबाबत एकवाक्यता प्रकट झालेली आहे.[१] प्रत्येक अभ्यासकाने ह्या अवतरणक्षमतेची वैशिष्ट्ये नोंदविताना, तिच्या ठायी असणाऱ्या व्यावहारिक प्रबोधनशक्ती, सौंदर्यशक्ती व इतर काही गुणांचा उल्लेख करून अवतरणक्षमतेची व्यापकता सिद्ध केलेली आहे. ह्यादृष्टीने काही अभ्यासकांची निरीक्षणे पाहू.

डॉ. वि.भि. कोलते यांच्या मते तुकोबांचे उत्कट भावजीवन, व्यापक अनुभूती, कवीचे हृदय व परमेश्वरी प्रेरणा या गोष्टींमुळे तुकोबांच्या काव्याला हे बळ लाभले आहे.[२] तुकोबांच्या शेकडो उक्तींना जो सुभाषितांचा किंवा म्हणींचा दर्जा प्राप्त झाला आहे त्याचे मर्म ह्या सुभाषितांमध्ये सामावलेल्या प्रखर वास्तववादी व भावगीतात्मक सौंदर्यात आहे. म्हणून विद्वान आपल्या युक्तिवादांसाठी पुरावा म्हणून तुकोबांच्या चपखल (Pointed) वचनांचा आधार घेतात, वक्ते श्रोत्यांना मोहित करण्यासाठी तुकोबांच्या चरणांचा वापर करतात; तर कित्येक मराठी कादंबऱ्या व नाटके तुकारामांच्या वचनांचा शीर्षक म्हणून वापर करून घेतात असे डॉ. भालचंद्र नेमाडे यांचे निरीक्षण आहे.[३] तुकोबांची सुभाषिते ही सहजोत्स्फूर्त व लाजबाब आहेत. ती मराठी भाषेच्या सामाईक धनात सामील झालेली आहेत. जीवनाच्या वेगवेगळ्या अंगांचे खोल ज्ञान करून देऊन मूल्यविवेक देण्याचे सामर्थ्य त्यांच्यात आहे; तसेच असांकेतिकता हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. यामुळे आपल्याला एक भेदक नजर प्राप्त होते, असे दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांचे मत आहे.[४] प्रा. रा.ग. जाधव यांनी तुकोबांच्या काव्यातील अवतरणक्षमतेचा एका स्वतंत्र प्रकरणात विस्तृत विचार केलेला आहे. यात तुकोबांच्या काही अवतरणांच्या सौंदर्यतत्त्वाचे मर्म, अवतरणक्षम वचनांना जन्म देणाऱ्या कवितेची प्रकृती, भिन्न भिन्न प्रकृतीच्या व्यक्तींना आपल्या मनोगतानुसार उपयोगी पडण्याचा तुकोबांच्या काव्यावतरणांचा गुण, काही कवितांचे मर्म उकलण्यास साहाय्यकारी ठरणारी अवतरणक्षम नसलेली, पण अवतरणक्षमतेची बीजे असलेली वचने इत्यादी गोष्टींचा समावेश आहे व त्यांचे स्पष्टीकरण करण्याचा प्रा. जाधवांनी प्रयत्न केला आहे.[५]

प्रा. जाधव वगळता वरील इतर अभ्यासकांची निरीक्षणे ही त्यांच्या त्यांच्या अभ्यासाच्या विशिष्ट परिघांतील असल्यामुळे मर्यादित व सर्वसाधारण विवेचन करणारी आहेत. प्रा. जाधवांनी विविध कोनांतून अवतरणक्षमता जोखण्याचा प्रयत्न केला आहे. अवतरणक्षम विधानांची रचना व आलंकारिकता याही मुद्यांना त्यांनी स्पर्श केला आहे. आपल्या रसिकावलोकनातून अवतरणक्षमतेचा चिकित्सक आस्वाद घेण्याचा त्यांचा ह्या प्रयत्न आहे. आस्वाद घेण्याच्या त्यांच्या ह्या प्रयत्नात आस्वादांगभूत काही मर्यादा पडल्या आहेत हे उघडच आहे.

वरील प्रातिनिधिक प्रयत्न या संदर्भातील पुढील अभ्यासाच्या दृष्टीने दिशादर्शक आहेत. त्या दृष्टीने अधिक काही विचार करण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखात करायचा आहे.

तुकोबांच्या अवतरणांमध्ये एक मंत्रशक्ती आहे. (हे विधान तुकोबांच्या सबंध अभंगालाही लागू आहे. अर्थात यासंबंधीचे विवेचन पुढे येईलच) या मंत्रशक्तीचे रहस्य शोधणे हा प्रमुख भाग आहे. यामध्ये ती अवतरणे ज्या मुखातून अवतरली त्या मुखनायकाचे व्यक्तित्व, अवतरणांचा रचनाबंध, रचनाबंधात अंतर्भूत असलेल्या काही शैलीगत घटकांमुळे रचनाबंधाला प्राप्त झालेले सौंदर्य, अवतरणांमुळे मानवी मनाला होणाऱ्या विविध जाणिवा, अवतरणांमधून प्रत्ययाला येणाऱ्या वैश्विक व सार्वकालीन सत्यांमुळे अवतरणांना लाभलेला चिरकालिक नाजेपणा इत्यादी गोष्टींचा विचार इथे प्रस्तुत आहे.

ज्ञानदेवांनी गीतेच्या संदर्भात

*"साचचि बोलाचे नव्हें हें शास्त्र।*
*पै संसारु जिणे तें हें शस्त्र।*
*आत्मा अवतरविते मंत्र।*
*अक्षरें इयें।।"* — *ज्ञानेश्वरी* १५.५४३




अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असे उद्‌गार काढले आहेत. खरोखरीच गीता हे केवळ शब्दपांडित्य दाखविणारे शास्त्र नव्हे; तर संसार जिंकणारे ते हत्यार आहे. गीतेतील 'अक्षरे' ही आत्म्याला प्रगट करणारे 'मंत्र'च आहेत. गीतेच्या संदर्भात हे उद्‌गार जितके सार्थक आहेत तितकेच ते सबंध संतसाहित्याबाबतही सार्थ आहेत. म्हणून संतवाणी ही मंत्रवाणी आहे.

मंत्रवाणी ही दैवीवाणी असते हे डॉ. ग.त्र्यं. देशपांडे यांनी साधार स्पष्ट केले आहे. दैवीवाणी साधुसंतांच्या, ऋषीमुनींच्या मुखातून वैखरीच्या रूपाने आपल्यापर्यंत येते. तिच्या ठिकाणी प्रचोदकता म्हणजे प्रेरणा देण्याची शक्ती असते. ह्या तिच्या अंगभूत शक्तीमुळे ती आपल्या ठिकाणच्या आत्मशक्तीला जागृत करते. ऋषीमुनी, साधुसंत यांना अनुक्रमे तपध्यानयोग व भक्तिभावामुळे ईश्वरी कृपाप्रसाद प्राप्त होतो व त्यामुळे आत्मशक्ती ही सर्व जगत्कारणाची अधिष्ठात्री आहे हे जाणवते. अशा वेळी देहबद्ध अवस्था जाऊन विश्वमय अवस्था होते. म्हणूनच "तो देहसंगे तरी असे। परि चैतन्या-सारिखा दिसे। आणि परब्रह्माचेनि कसे। चोखाळु भला।" (*ज्ञानेश्वरी* ११.१) असे ज्ञानदेव म्हणतात हे डॉ. देशपांडे यांनी स्पष्ट केले आहे.[६]

दैवीवाणी प्रेरक, प्रचोदक असते. ही प्रेरकता ती वाणी अखंड वाक्यरूप असते म्हणून येते. डॉ. देशपांडे यांनी संत नामदेवांचा एक अभंग घेऊन याचे स्पष्टीकरण केले आहे. संत नामदेवांचा अभंग असा :

*जैसा वृक्ष नेणे मान अपमान।*
*तैसे ते सज्जन वर्तताती।।१।।*
*येऊनीया पूजा प्राणी जे करिती।*
*त्यांचे सुख चित्ती तया नाही।।२।।*
*अथवा कोणी प्राणी येऊनी तोडिती।*
*तया न म्हणती छेदू नका।।३।।*
*निंदा स्तुती सम मानिती जे संत।*
*पूर्ण धैर्यवंत साधु ऐसे।।४।।*
*नामा म्हणे त्यांची मज होय भेटी।*
*जीवा शिवा गाठी पडुनी जाय।।५।।*

संतांचे वैशिष्ट्य व संतसंगतीचा लाभ सांगणारे पाच वाक्यांचे मिळून तयार झालेले हे एक अखंड महावाक्य आहे. ह्या महावाक्यामुळे परिणाम जाणवतो. पदान्वय करून अर्थप्रतीती होईल; पण अनुभवाची प्रचिती येणार नाही. म्हणून मंत्राक्षरत्व धारण केलेले व प्रचोदक झालेले नामदेवांच्या मुखातून निघालेले वाक्य 'अखंड वाक्य' – 'अभंग-वाक्य' – आहे. डॉ. देशपांडे यांनी संतांच्या अभंगवाणीचे लक्षणीय वैशिष्ट्य अचूकपणे हेरले आहे.[७]

आता महावाक्य म्हणजे काय हे प्रथम समजून घेऊ. वाक्य पदसमूहरूप असते. आकांक्षा, योग्यता आणि सानिध्य या तीन धर्मांनी पदे युक्त असतात व त्यामुळे वाक्य बनते. ह्या वाक्यात अर्थैकत्व असते. याप्रमाणेच उपरोल्लेखित धर्मांनी युक्त असणाऱ्या वाक्यसमुच्चयाला महावाक्य असे म्हणतात. हे महावाक्यही अर्थैकत्वयुक्त असते. महावाक्याचे उदाहरण म्हणून विश्वनाथाने रामायण, रघुवंश इत्यादी काव्यांचा उल्लेख केला आहे. वक्त्याच्या मनातील अर्थाचे ग्रथन करणारा पदांचा संदर्भ म्हणजे वाक्य असे राजशेखराचे म्हणे आहे, तसेच कविमनातील अर्थाचे ग्रथन करणारा वाक्यसंदर्भ म्हणजे महावाक्य असे म्हणता येईल, असे डॉ. देशपांडे यांनी स्पष्ट केले आहे.[८]

महावाक्य हे वैखरीच्या रूपाने मूर्त होते. वैखरी ही व्यवहाररूपाने प्रकटणारी भाषा. वैखरीच्या आधी परा, पश्यन्ती व मध्यमा अशा वाणीच्या तीन अवस्था असतात. मंत्रद्रष्ट्या ऋषींनी मात्र अवर ऋषींना वैखरी स्वरूपातच उपदेश पद्धतीने मंत्र प्रदान केले; पण याचबरोबर हे मंत्र जेथून अवतरले त्या उगमस्थानाचा साक्षात्कार करून घ्या, असे सुचविले. उगम-स्थानाचा साक्षात्कार करण्यातच मंत्राची सार्थकता असल्यामुळे त्यांनी असे सुचविले. (ज्ञानदेव 'आत्मा अवतरविते मंत्र' म्हणतात ते आत्मतत्त्व हे उगमस्थान. परावाणीचे तत्त्व. म्हणजेच परतत्त्व. ज्ञानदेव यासाठीच काव्याला परतत्त्वाचा स्पर्श लाभावा असे म्हणतात.) या पार्श्वभूमीवर "नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी। एक तरी ओवी अनुभवावी।।" ह्या संत नामदेवांच्या वचनाचे डॉ. देशपांडे स्मरण देऊन रहस्योद्घाटनही करतात.[९]

वरील विवेचन ध्यानात घेतले की, "माझा शब्द नव्हे एकदेशी। सांडी गवशी कोणाला। जाली माझी वैखरी। विश्वंभरी व्यापक।।" (६९२) "नव्हे एकदेशी शब्द हा उखता। ब्रह्मांडापुरता घेईल त्यासी।।" (१६६४), "बोलाविले जेणे तो चि याचे गुह्य जाणे" (१७७३), "तुका म्हणे बोल। माझे बोलतो विठ्ठल।।" (१७७३), "माझिया युक्तीचा नव्हे हा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रकार। मज विश्वंभर बोलवितो।।" (१७०७) इत्यादी वचनांचे गुह्य कळते व तुकोबा "आम्हां घरी धन शब्दांचीच रत्ने। शब्दांचीच शस्त्रे यत्न करू। शब्द चि आमुच्या जीवाचे जीवन। शब्दे वाटू धन जनलोका।। तुका म्हणे पहा शब्द चि हा देव। शब्दे चि गौरव पूजा करू।।" (३३९६) असे का म्हणतात, याचे मर्म ध्यानात येते.

तुकोबांच्या आत्मानुभूतीला मुखर करणारी त्यांची वैखरी वाणी ही इतरेजनांकडून 'आत्मा अवतरविते मंत्र' या स्वरूपात अनुभविली जाते की नाही हे कळणे कठीण; किंबहुना अनुभविली जाणे व त्यासंबंधी कळणे कठीण. पण आबालसुबोध, साक्षर-निरक्षर, भाविकव्यावसायिक यांची ती समान संपत्ती झाली आहे व जो तो आपापल्या युक्तीच्या प्रकाराने ती वापरतो, हे मात्र सत्य आहे. यावरून हे लक्षात येते की, जवळपास सर्वच भाषक तुकोबांच्या वाणीचा वैखरी स्वरूपातच विचार करतात, वैखरी स्वरूपातच तिला अनुभवतात, वैखरी स्वरूपातच आपले मनोगत मिसळून तिच्या सुरात बोलतात आणि आपापल्या इच्छेनुसार मूळ वैखरी रूपातच काही अनुरूप बदल घडवून तिला चलनी नाणे बनवतात. वैखरी पातळीवरचा आपला व्यवहार चमत्कृतिपूर्ण व परिणामकारक व्हावा यासाठी विभिन्न प्रकृतीच्या भाषकांकडून असे होणे स्वाभाविक असते. यामुळे मूळ वाणीला व्यावहारिक पातळीवरचे अलंकरणाचे कार्य पार पाडावे लागते. यामुळे आपण असे म्हणू शकतो की, अशा प्रकारच्या वाणीला दोन अंगे असतात. एक, अनुभवप्रचीती आणून देणारे व दुसरे, अलंकरणाचे कार्य पार पाडणारे. अनुभवप्रचिती आणून देणारे अंग हे स्वयमेव सौंदर्यसंपन्न व संदर्भनिष्ठ असते. अलंकरणाचे कार्य पार पाडणारे अंगही सौंदर्यसंपन्नच असते; पण ते संदर्भनिष्ठ नसते. यामुळे कुठलाही भाषक हव्या त्या हेतुपूर्तीसाठी हव्या त्या संदर्भात अलंकरणाचे कार्य करणाऱ्या अंगाचा वापर करून आपला कार्यभाग साधत असतो.

तुकोबांची वाणी "कोण सांगायास। गेले होतें देशोदेश। नेले वाऱ्या हाती माप। समर्थ तो माझा बाप।।" या न्यायाने सर्वतोमुखी आहे. प्रत्येक मराठी भाषक ती आत्मविश्वासाने वापरत असला तरी तिचा 'अखंड महावाक्या'च्या स्वरूपात अनुभव घेतला पाहिजे हे क्वचितच जाणतो. अर्थात ते शक्य नाही ही वस्तुस्थिती आहे. म्हणून तुकोबांचा अनुभव व प्रसंगपरत्वे वापर करणाऱ्या मराठी भाषकांचा अनुभव यात महदंतर पडते, आणि उरते फक्त तुकोबांच्या अखंड महावाक्यांची किंवा सुट्या सुट्या वाक्यांची अवतरणक्षमता. म्हणजेच वैखरी. म्हणजेच संज्ञापनव्यवहार घडवून आणणारी भाषा. या संदर्भात डॉ. सुधीर रसाळ यांनी म्हटले आहे की, "कवितेतील रूपकांचा अनेकदा व्यवहारात उपयोग होताना दिसतो. आपल्याकडे तुकारामांच्या रूपकांचा व इंग्रजीतील शेक्सपियरच्या रूपकांचा असा वापर होताना दिसतो. ही रूपके वापरताना ती मूळ संदर्भापासून तोडून घेतलेली असतात आणि त्यांना व्यावहारिक पातळीवर उतरविलेले असते. 'तेलिणीसी रुसला वेडा', 'सुख पातां जवापाडे' किंवा 'भले तरी देऊं' यांसारख्या तुकारामांच्या रूपकांचे मूळ अभंगांतील स्थान, कार्य व वाचकावरील त्यांचा परिणाम आणि व्यवहारात ही रूपके वापरताना असलेले त्यांचे प्रयोजन व परिणाम यांची तुलना केल्यावर हे संदर्भ कसे बदलतात हे अधिक स्पष्ट होईल. व्यवहारात तुकारामांच्या या उक्तींना कसलाही आध्यात्मिक संदर्भ लाभत नाही."[१०] म्हणून व्यावहारिक पातळीवर उतरविलेल्या भाषेचा आपण भाषावैज्ञानिक पद्धतीने विचार करू शकतो; कारण "भाषाव्यवहाराच्या केंद्रस्थानी 'वैखरी' असते. शब्दांत योगाचं अंतिम टोक 'वैखरी' हे असतं अन् 'वैखरी'पासूनच शब्दपूर्वयोगाला प्रारंभ होतो. थोडक्यात, वक्ता अन् श्रोता ह्यांना जोडणारा पूल म्हणजे 'वैखरी' असं म्हणता येईल." असे डॉ. अशोक केळकर यांनी स्पष्ट केले आहे. 'परा वाक्' हे 'पश्यन्ती'चेच दुसरे रूप. परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी ही वाणीचतुष्टकाची कल्पना प्रसिद्ध आहे. पश्यन्ती वाणी जेव्हा लौकिक व्यवहाराच्या पलीकडे जाते. या वाणीमुळे जे दिसते ते अनिर्वचनीय असते. 'वैखरी'पर्यंत ते पोचतच नाही, असेही डॉ. केळकर यांनी विवेचन केले आहे.[११] महावाक्य स्वरूपातल्या वैखरीत तुकोबांसारख्या महाकवीचा जो अनुभव साठवलेला असतो, तो आकळण्याऐवजी त्या अनुभवाच्या स्पष्टीकरणार्थ दिलेली उदाहरणे किंवा स्फुट अनुभव वैखरी पातळीवर आकळतो. तुकोबांच्या अवतरणक्षम विधानांचा अगर उदाहरणांचा यादृष्टीने विचार करण्याचा प्रयत्न करू.

वैखरी स्वरूपातले काव्य म्हटले की, यमकतत्त्व, ध्वनींची पुनरावृत्ती, ध्वनिविरोध व ध्वनिविरोधामुळे जाणवणारा अर्थविरोध हे व इतर मानसिक परिणाम करणारे भाषिक घटक लक्षात येतातच. सर्वच भाषांमध्ये हे घटक मौजूद


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असतात. सामान्य भाषिक व्यवहारातदेखील यातील एकाददुसरा घटक वापरला जाऊन भाषिक चमत्कृती साधली जाते. प्रतिभासंपन्न व्यक्ती तर ह्या उपरोल्लेखित द्रव्याच्या साह्याने सर्जनच करीत असतात.[१२]

आता आपण तुकोबांच्या सुमारे शंभर अवतरणक्षम वचनांचा विचार करू. सलग वाचीत असताना सबंध गाथेतील चट्कन जाणवलेली ही अशी उदाहरणे आहेत. सर्वच उदाहरणे पद्यरचनेतील असल्यामुळे पद्यरचनेची विशिष्ट वैशिष्ट्ये घेऊन अवतरलेली आहेत. उदाहरणार्थ :

*"असाध्य ते साध्य करिता सायास।*
*कारण अभ्यास तुका म्हणे।।*

या ओळीत नऊ पदे आहेत. पण अर्थसुबोधतेसाठी पदान्वय केला तर तो असा होईल.

(जे) असाध्य ते सायास (व) अभ्यास करिता साध्य (होते) (असे) तुकाराम म्हणतात; किंवा (जे) असाध्य ते सायास करिता साध्य (होते) (याचे) कारण अभ्यास (असे) तुकाराम म्हणतात. पदान्वयातल्यापेक्षा मूळ पद्यरचनेत पदसंख्या कमी आहे. यामुळे स्पष्टीकरणापेक्षा वाचकाच्या सर्जनक्षमतेला आवाहन केलेले असते. अजून काही उदाहरणे पाहू.

*"तुका म्हणे तोचि संत। सोसी जगाचे आघात।।"*

(जो) जगाचे आघात सोसतो तोच (खरा) संत (असे) तुकाराम म्हणतात. किंवा

*"मन करा रे प्रसन्न। सर्व सिद्धीचे कारण।।"*

(अ) रे (लोक हो) मन प्रसन्न करा; कारण (ते) सर्व सिद्धींचे कारण आहे. पदान्वय करताना स्पष्ट होणारे गद्य स्पष्टीकरण पद्यात लुप्त होते. या गद्य स्पष्टीकरणात संबंधी सर्वनामे, संबोधन, संबोधनाचे प्रत्यय, विरामचिन्हे इत्यादी घटकांचा समावेश करता येईल. या घटकांच्या अनुपस्थितीमुळे पद्यरचना नेमकी व बंदिस्त होते. ह्या अनुपस्थित घटकांची नुकसानभरपाई कवी निराळ्या मार्गांनी करून घेतो. उदाहरणार्थ, ताल हा घटक लक्षात घेता येईल. लेखनात विरामचिह्नांचे जे स्थान ते उच्चारणात तालाचे स्थान मानता येईल. वाक्यरचनेत रूढ असलेल्या योग्यता, आकांक्षा व संनिधी या धर्मांचे उल्लंघन करून पद्यात पदांची मांडणी करावी लागते. परिणामत: वाचकालाही अशा रचना सावधपणे वाचाव्या लागतात. अवरोध (arrest) व उद्घाटन (release) ही काव्यातील तत्त्वेच होत. सुट्या रचनेमधून जसा त्याचा आविष्कार होतो तसाच महावाक्यातूनही होतो. उदाहरणार्थ,

"मन करा रे प्रसन्न। सर्व सिद्धीचे कारण।।"

ह्या पद्यरचनेत सर्व हे पद अवरोधक आहे; पण लगेच दुसऱ्या चरणात त्याचे उद्घाटन होते.

*"मोक्ष अथवा बंधन। सुख समाधान इच्छा ते।"*

इथे आकांक्षा व संनिधी या दोन्ही धर्मांचे उल्लंघन झालेले आहे.

यापूर्वी तालाचा उल्लेख झालेला आहेच. यति, विरामचिह्ने यांच्या अनुपस्थितीमुळे ताल (इथे stress या अर्थाने अधिक अभिप्रेत आहे.) कसे कार्य बजावतो ते पाहू.

*तुका म्हणे तोचि संत। सोसी जगाचे आघात।।*

इथे तोचि, सोसी व आघात यांच्यावर नकळतपणे दाब पडतो. हे अर्थातच पद्यरचनेचे वैशिष्ट्य आहे. है वैशिष्ट्य अर्थाभिव्यक्तीला पूरक ठरते. 'तोचि' या पदावरचा आघात कोण असा प्रश्न मनात जागा करतो. लगेच 'सोसी' हे क्रियापद येते. झेलणे या क्रियापदापेक्षा ते अधिक संपृक्त आहे. 'आघात' हे पदही आघातयुक्त (stressed) आहे. जगाचे आघात. एकट्यादुकट्याचे नाही. तुकोबांनी संतांची ही व्याख्याच करून टाकली आहे. व्याख्या म्हणजे सूत्र. सार. यामुळे संत व सामान्य व्यक्ती यातला फरक फारच सूक्ष्मपणे कळतो. त्याचे स्पष्टीकरण असे करता येईल.

**सामान्य व्यक्ती** : + (मानुष) + (प्रौढ) ± (नर) − (जगाचे आघात सोसणे)

**संत** : + (मानुष) + (प्रौढ) ± (नर) + (जगाचे आघात सोसणे)

'जगाचे आघात सोसणे' ही कसोटी ठरते व ह्या कसोटीला उतरणे म्हणजे संतपदाला जाणे. ('संत जेणे व्हावे तेणे जग बोलणे सोसावे') ह्या संत मुक्ताबाईंच्या वचनाचे स्मरण व्हावे व संतवाणीची एकवाक्यता ध्यानात यावी.

ह्या मिताक्षरी रचनांना ध्वनींच्या पुनरावृत्तीची जोड मिळाली की, आघातालाच पूरक अशा नादतत्त्वाची जोड मिळते. विशिष्ट ठेक्यातील उच्चारणाला जर नादाची जोड मिळाली तर एक श्रुतिसुखदता व उच्चारणसुखदताही अनुभवास येते. उदाहरणार्थ :





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

"असाध्य ते साध्य करिता सायास। कारण अभ्यास तुका म्हणे।।" ह्या ओळीतील 'ध्य' व 'भ्या' ह्या व्यंजनस्वर युग्माची आवृत्ती व 'स', 'क', 'त' ह्या ध्वनींची आवृत्ती नादमय झाली आहे. असाध्य व साध्य यांतील ध्वनिनिष्ठ साम्य 'अ' ह्या अक्षरामुळे, साम्याच्या पार्श्वभूमीवर, विरोध ठळक करते.

*"मनाच्या तळमळे। चंदनेही अंग पोळे।।"*

*"जे कां रंजले गांजले। त्यांसि म्हणे जो आपुले।।*

*तो चि साधु ओळखावा। देव तेथें चि जाणावा।।"*

*"भंगलिया चित्ता। न ये काशाने सांदिता।।"*

*"बोले तैसा चाले। त्याची वंदीन पाऊले।।"*

*"शुद्ध बीजा पोटी। फळे रसाळ गोमटी।।"* इत्यादी.

अर्थात सर्वच उदाहरणे ध्वनींच्या आवृत्तीच्यादृष्टीने लक्षात घेण्यासारखी आहेत.

विश्लेषणासाठी घेतलेली सर्वच उदाहरणे देवद्वार व देवीवर या अभंग छंदांतील आहेत. व विशेष म्हणजे त्यांचे प्रमाणही सम आहे. एक वचन घनाक्षरीतील [देव राखे तया मारील कोण। न मोडे काटा हिंडता वन।। (१६१४)] व एक दिंडीतील [अतिप्रयत्ने गाळिता वायुवेतें। दिव्य तेलाची प्राप्त होय तेथें।। (४२८२)] आहे. ही दोन अपवादात्मक उदाहरणे आहेत. छंदशास्त्रदृष्ट्या विचार केला तर त्यांना अपवादात्मक म्हणायचे! देवद्वार छंदातील अभंगाची रचना चालीवर म्हणताना आघातालपूर्वक अष्टमात्रक आवर्तनाची लयबद्धता प्राप्त होऊन होते.

*'तुऽका म्हणे अऽसे हातींचें काकऽण।*

*तयासी दऽर्पणऽविऽल्हाळऽक।'*

पण हीच ओळ गद्य सरणीत उच्चारायची झाली तर तिचा ताल बदलतो.

*तुका म्हणे असे हातींचें काकण।*

*तयासी दर्पण विल्हाळक।।*

गानसरणी व उच्चारणसरणी यातील हा भेद महत्त्वपूर्ण आहे. देवीवर छंदातील अभंगांची रचनाही चालीवर म्हणताना अष्टमात्रक आवर्तनाची लयबद्धता प्राप्त होऊन होते.

*हे चिऽ दानऽ देगा देवा।*

*तुऽझा विसऽर नऽ व्हावा।।*

गद्य सरणीत याच ओळीचे उच्चारण

*हे चि दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा।।*

असे आघातालपूर्वक होईल. गद्यसरणीच्या उच्चारणात अर्थ-घटकानुसार वाक्यच्छेद पडून तालबद्धता प्राप्त होते. गान-सरणीतील अष्टमात्रक आवर्तनलयीत षण्मात्रक आवर्तन लयीचे वैचित्र्य साधले जाते. पण ती चर्चा इथे प्रस्तुत नाही.

पद्यरचनेच्या लयबद्धतेत यमकाचाही वाटा असतो. देवद्वार छंदातील अभंगांची यमकरचना अ, ब, ब, क अशी; तर देवीवर छंदातील अभंगांची यमकरचना अ, अ, ब, ब,.... अशा स्वरूपाची असते.

तुका म्हणे असे। अ

हातीचे काक<u>ण</u>। <u>ब</u>

तयासी दर्प<u>ण</u>। <u>ब</u>

विल्हाळक।। क

वरील उदाहरण देवद्वार छंदातील अभंगाचे; तर देवीवर छंदातील अभंगाची यमकरचना खालीलप्रमाणे :

हे चि दान देगा दे<u>वा</u>। अ

तुझा विसर न व्हा<u>वा</u>। अ

गुण गाईन आव<u>डी</u>। ब

हे चि माझी सर्व जो<u>डी</u>।। ब

गानसरणीच्या संदर्भात केलेल्या चर्चेत पाहिल्याप्रमाणे या रचना आवर्तकलय घेऊन अवतरतात. म्हणजे या रचना विलंबित व दीर्घोच्चारणाच्या प्रकृतीला अनुकूल असतात. यामुळे कमी पडणाऱ्या मात्रांची कूस भरून काढली जाऊन लयबद्धता साधली जाते. विलंबित किंवा दीर्घोच्चारण दर्शविण्यासाठी ऽ अशी खूण वापरली जाते. या संदर्भात उद्धृत केलेल्या उदाहरणांवरून हे लक्षात येईल.

तुकोबांच्या काव्यावतरणांच्या ह्या सर्वसाधारण व ढोबळ वैशिष्ट्यांनंतर आता आपण जरा सूक्ष्म वैशिष्ट्यांचा विचार करू. तुकोबांच्या अवतरणक्षम महावाक्याचे किंवा सुट्या वाक्याचे एक सहजपणे लक्षात् येणारे वैशिष्ट्य म्हणजे ते बरेचदा संवादात्मक (communicative) असते. संज्ञापन अगर संवाद हे जरी भाषेचे व्यवच्छेदक लक्षण असले तरी संवादात्मक रचनांची विशिष्ट प्रकृती असते व ती परिणामकारी असते. लोकांच्या भल्यासाठी तुकोबा कीर्तनातून तर हा संवाद साधायचेच; पण "तुका म्हणे होय मनासी संवाद।






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपुला चि वाद आपणांसी।।" (२४८१) असा मनातल्या मनातही संवाद साधायचे. जगदुद्धाराच्या त्यांच्या या तीव्र तळमळीमुळे लोकांपुढच्या आसनावरचे कीर्तन असो अंगर चित्ताच्या आसनावरचे कीर्तन असो [चित्ताचे आसन। तुका करितो कीर्तन।। (१२९१)] त्यांच्या आविष्कारात संबोधनात्मक वचने येतात व ती समूहमनाला आकर्षून घेतात. या संदर्भातील काही उदाहरणे अशी :

- *तुज आहे तुजपासी।*
  *परि तू जागा चुकलासी।। (४१४)*
- *पराविया नारी माऊलीसमान।*
  *परधनी बाटो नेदी मन।। (४५०)*
- *नाही निर्मळ जीवन।*
  *काय करील साबण।। (७६५)*
- *मन करा रे प्रसन्न।*
  *सर्व सिद्धीचे कारण।। (२९१)*
- *आम्ही वैकुंठवासी।*
  *आलों या चि कारणासी।। (५२०)*
- *नको नको मना गुंतू मायाजाळीं।*
  *काळ आला जवळी ग्रासावया।। (२८०६)*
- *काळाची ही उडी पडेल बा जेव्हां।*
  *सोडवीना तेव्हां मायबाप।। (२८०८)*
- *तुका म्हणे येथे पाहिजे जातीचें।*
  *येरा गबाळाचे काय काम।। (३१२८)*
- *धन मेळवूनि कोटी।*
  *सवें न यें रे लंगोटी।। (३८३६)*
- *आले देवाचिया मना।*
  *तेथें कोणाचे चालेना।। (१६२८)*

वरील उदाहरणांत प्रश्नार्थक, संबोधनात्मक, प्रश्न गृहीत धरून त्याचे उत्तर देणारे विधान अशा प्रकारच्या रचना आहेत. या रचना आवाहक आहेत. तुकोबांनी आपल्या विवेचनाच्या ओघात सांगितलेली उदाहरणे, जनरीतीचे स्पष्टीकरण, काही व्यावहारिक सत्ये यांना या आवाहकतेमुळे सुभाषितांचा दर्जा प्राप्त झाला आहे.

अशा या सुभाषितात्मक रचनांचा अलंकारांच्या अंगाने विचार करू. तुकोबांच्या या रचना उदाहरणादाखल आलेल्या म्हणून उघडच दृष्टान्त अलंकारांची उदाहरणे आहेत. पण याशिवाय यांच्यात इतरही अलंकार एकवटलेले दिसतात. उदाहरणार्थ,

"नाही निर्मळ जीवन। काय करील साबण।।" (७६५) यात जीवन म्हणजे पाणी व जीवन म्हणजे जगणे ह्या दोन अर्थांमुळे श्लेषालंकार साधला गेलेला आहे. जगणेच जर विशुद्ध नसेल तर आत्मबोधाचा साबण काय करील? श्लेषा-बरोबरच इथे लुप्तोपमाही आहे; तसेच आत्मबोधाचा साबण हा रूपकालंकार आधारभूत आहेच. त्याचप्रमाणे हे वाक्य संपूर्ण अभंगाच्या संदर्भात लक्षात घेतलें तर अर्थांतरन्यास अलंकाराचे उदाहरण होते. संपूर्ण अभंग असा :

*नाहीं निर्मळ जीवन। काय करील साबण।।१।।*
*तैसी चित्तशुद्धि नाहीं। तेथें बोध करील काई।।ध्रु.।।*
*वृक्ष न धरी पुष्पफळ। काय करील वसंतकाळ।।२।।*
*वांजे न होती लेकरें। काय करावें भ्रतारें।।३।।*
*नंपुसका पुरुषासी। काय करील बाइल त्यासी।।४।।*
*प्राण गेलिया शरीर। काय करील वेव्हार।।५।।*
*तुका म्हणे जीवनेंविण। पीक नव्हे नव्हे जाण।।६।।*

"असाध्य ते साध्य करिता सायास। कारण अभ्यास तुका म्हणे।।", "तुका म्हणे तो चि संत। सोसी जगाचे आघात।।" ही व इतर काही अर्थांतरन्यास अलंकाराचीच उदाहरणे होत.

"मृदु सबाह्य नवनीत। तैसे सज्जनाचे चित्त।।" ह्यात उपमा अलंकार आहे; तर

*"हालवूनि खुंट। आधी करावा बळकट।।" (१८४९)*
*"तुका म्हणे मना पाहिजे अंकुश।*
*नित्य नवा दिस जागृतीचा।।" (१५४१)*
*"बुडता हे जन न देखवे डोळा।*
*येतो कळवळा म्हणउनि।।" (९४८)*

या उदाहरणांत लुप्तोपमा अलंकार आहे. आपली जीवदशा नाहीशी करून ब्रह्मरूपाने राहावे; यासाठी मन बळकट करावे; म्हणून 'हालवूनि खुंट। आधी करावे बळकट' ही लुप्तोपमा; तसेच इथे 'स्थाणुनिखनन्याय'ही आहेच. हत्तीला अंकुशाचा मार तसा भक्ताच्या मनास विचारजागृतीचा मार व संसार-सागरात बुडणारी जनता व डोळ्यांनी हे दृश्य ज्यांना पाहवत नाही असे संत. वरील उदाहरणांतील लुप्तोपमा अलंकाराचे हे असे स्पष्टीकरण करता येईल.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तुकोबांच्या अवतरणांमध्ये लोकोक्ति अलंकाराचीही खूप उदाहरणे आहेत. काही उदाहरणे अशी :

- *"व्याली कुऱ्हाडीचा दांडा।
  वर न घली च तोंडा।।" (३५२)*
- *"तुका म्हणे बळी।
  तो गांढ्याचे कान पिळी।।" (७७१)*
- *"पालथे घागरी घातलें जीवन।
  न धरी च जाण तें ही त्याला।।" (१७२८)*
- *"मुंगी होऊनि साकर खावी।
  निज वस्तूची भेटी घ्यावी।।" (२८९२)*

तुकोबा लोकोक्तींचा वापर स्वप्रयोजक व सौंदर्यसंपन्न कसा करून घेतात हे वरील उदाहरणांवरून लक्षात घ्यावे. 'बळी तो कान पिळी' ह्या मूळ लोकोक्तीत 'गांढ्याचे' हा बोलीभाषेतील खास शब्द वापरून बळी व गांढ्या ह्या दोन्हींतून अर्थात्मक विरोध निर्माण केला आहे व मूळ आशय पुष्ट केला आहे. तुकोबांनी विपथित (deviated) केलेली म्हण प्रत्येक चरणाच्या आरंभीच वापरून पुरोभूमीकरण (fore-grounding) केलेले आहे.

*"पालथे घागरी रिचविता जळ।
तुका म्हणे खळ तैसे कथे।।" (४०५९)
"अर्भकाचे साटी। पंते हातीं धरिली पाटी।।" (४०८२)*

या उदाहरणांत 'वाक्यार्थनिदर्शना' अलंकार आहे. "पालथे घागरी रिचविता जळ...." यात लोकोक्ति व वाक्यार्थनिदर्शना या दोन्ही अलंकारांचा संयोग झालेला आहे.

वरील विविध वचनांमध्ये विविध अलंकार आपोआपच आल्यामुळे 'वैचित्र्यम् अलंकारः' या गुणधर्मानुसार वैचित्र्य प्राप्त झाले आहे.[१३] सौंदर्योत्पादक घटकांपैकी अलंकार हा एक महत्त्वाचा घटक आहे. तुकोबांची जगदुद्धाराची प्रचंड कळकळ व भाषेची उचित अलंकरणाकडे वळण्याची स्वाभाविक प्रवृत्ती यांतून ही वचने जन्माला आलेली आहेत. म्हणून ज्ञानदेवांनी म्हटल्याप्रमाणे

*"जैसे अंगाचेनि सुंदरपणे।
लेणियासी अंगचि होय लेणे।
तेथ अलंकरिले कवण कवणे।
निर्वचेना।।" ज्ञानेश्वरी १०.४४*

तुकोबांच्या वचनांना अलंकारांनी विभूषित केले की अलंकारांना तुकोबांच्या वचनांनी विभूषित केले हे सांगणे कठीण; एवढी ही सायुज्जता आहे.

आता तुकोबांच्या अवतरणांचा इतर वैशिष्ट्यांच्या संदर्भात विचार करू. यापैकी सर्वसाधारण व व्यवच्छेदक वैशिष्ट्य म्हणजे अवतरणांची प्रतिपक्षात्मक (antithetical) मांडणी. संपूर्ण अभंगाच्या संदर्भातही हेच वैशिष्ट्य दिसते. या दृष्टिकोनातील काही उदाहरणे अशी :

- *"ऐसी कळवळ्याची जाती।
  करी लाभाविण प्रीती।।" (१७४१)*
- *"मुंगी आणि राव।
  आम्हां सारखाची जीव।।" (१८९५)*
- *"सोने आणि माती।
  आम्हा समान हे चित्ती।।" (१८९५)*
- *"जे कां रंजले गांजले।
  त्यासि म्हणे जो आपुले।।" (३४७)*
- *"ज्यासि आपंगिता नाही।
  त्यासि धरी जो हृदयी।।" (३४७)*
- *"दया करणे पुत्रासी।
  ते चि दासा आणि दासी।।" (३४७)*
- *"असाध्य ते साध्य करिता सायास।
  कारण अभ्यास तुका म्हणे।।"*
- *"तुज आहे तुजपासीं।
  परि तू जागा चुकलासी।।" (४१४)*
- *"नाही निर्मळ जीवन।
  काय करील साबण।।" (७६५)*
- *"कोणी निंदा कोणी वंदा।
  आम्हा स्वहिताचा धंदा।।" (४३१४)*
- *"नाही काष्ठाचा गुमान।
  गोवी भ्रमरा सुमन।।" (१८९८)*
- *"भूतांची दया हे भांडवल संता।
  आपुली ममता नाही देही।।" (१५१०)*
- *"मोले घातले रडाया।
  नाहीं आसूं नाहीं माया।।" (२४९७)*
- *"बोलाचीच कढी बोलाचाचि भात।
  जेवूंनिया तृप्त कोण झाला।।" (३८७१)*









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

- *"ज्याचे अंगी मोठेपण।*
  *तया यातना कठीण।।" (१२८२)*
- *"महापुरे झाडे जाती।*
  *तेथें लव्हाळे राहाती।।" (१२८३)*
- *"वितीएवढेंसे पोट।*
  *केवढा बोभाट तयाचा।।" (२१९४)*
- *"मज पामरा हे काय थोरपण।*
  *पायींची वाहाण पायीं बरी।।" (२३३३)*
- *"बोलिली लेकुरें। वेडीं वांकुडी उत्तरें।*
- *क्षमा करा अपराध।*
  *महाराज तुम्हां सिद्ध।।" (२३३४)*
- *"दह्यांचिया अंगी निघे ताक लोणी।*
  *एका मोलें दोन्ही मागो नये।।" (२४१२)*
- *"वेडे वांकडे गाईन।*
  *परि मी तुझा चि म्हणवीन।।" (२७६७)*
- *"तुका म्हणजे येथे पाहिजे जातीचें।*
  *येरा गबाळाचे काय काम।।" (३१२८)*
- *"तुका म्हणे कढे करावी शीतळ।*
  *ऐसें जातिबळ चंदनाचें।।" (३१८०)*
- *"तुका म्हणे बरें धाकट्याचे जिणें।*
  *माता स्तनपानें वाढविले।।" (३२२७)*
- *"धन मेळवूनि कोटी।*
  *सवें नये रे लंगोटी।।" (३८३९)*
- *"मुलाम्याचे नाणे।*
  *तुका म्हणे नव्हे सोनें।।" (१५६६)*
- *"मिरासीचें म्हूण सेत।*
  *नाहीं देत पीक उगें।।" (८१)*
- *"सुख पहातां जवापाडें।*
  *दु:ख पर्वताएवढें।।" (८२)*
- *"भंगलिया चित्ता।*
  *न ये काशाने सांदिता।।" (९५)*
- *"सोनें रूपें आम्हां मृत्तिकेसमान।*
  *माणिके पाषाण खडे तैसे।।" (५२२)*
- *"मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास।*
  *कठीण वज्रास भेदूं ऐसे।।" (९८७)*
- *"जोडोनिया धन उत्तम वेव्हारें।*
  *उदास विचारें वेच करी।।" (२८६४)*
- *"जन हे सुखाचें दिल्याघेतल्याचें।*
  *अंत हे कांळीचे नाहीं कोणी।।" (२९९६)*

वरील काही उदाहरणांत दोन चरणांची प्रतिपक्षात्मक मांडणी आहे; तर काही उदाहरणांत पहिल्या चरणात प्रतिपक्षात्मक असे दोन घटक आहेत. व ह्या पहिल्या चरणाचा प्रतिपक्ष म्हणून दुसरा चरण येतो. उदाहरणार्थ,

- *महापुरे झाडे जाती। तेथे लव्हाळे राहाती।।*
- *धन मेळवूनि कोटी। सवें नये रे लंगोटी।।*

यांत दोन चरणांची मांडणी प्रतिपक्षात्मक आहे; तर

- *मुंगी आणि राव। आम्हां सारखाची जीव।।*
- *तुका म्हणजे कढे करावी शीतळ।*
  *ऐसें जातिबळ चंदनाचें।।*

यांत प्रथम चरणात प्रतिपक्षात्मक घटक येतात व दुसऱ्या चरणात पहिल्या चरणाशी प्रतिपक्षात्मक कल्पना येते.

ह्या प्रतिपक्षात्मक मांडणीमुळे अर्थपोषकता कशी येते, याचा विचार करू.

*महापुरे झाडे जाती। तेथे लव्हाळे राहाती।।*

या उदाहरणात शुद्ध यमक साधलेले असून यमकामुळे बंदिस्तपणाही आला आहे. 'जाती' व 'राहाती' यांची अक्षरफोड अशी होईल.

ज् + <u>आ + त् + ई</u> व र् + आ + ह् + <u>आ + त् + ई</u>

यांत आ + त् + ई हे अंत्य घटक समान आहेत म्हणून शुद्ध यमक व या साधर्म्याच्या पार्श्वभूमीवर 'जा' व 'राहा' किंवा 'ऱ्हा' यातील वैधर्म्य स्पष्टपणे जाणवते. हा ध्वनिनिष्ठ परिणाम आहे म्हणून 'नाती' व 'राहाती' या दोन क्रियांतील पहिलीची गती व दुसरीची स्थिती हा भेद स्पष्ट होतो. 'झाडे' व 'लव्हाळे' यांतील प्रतिमा अर्थाने जाणवणारा अर्थभेद उघडच आहे. झ् + आ + ड् + ए हे अर्धस्फोटक + स्वर + स्फोटक + स्वर असे दीर्घोच्चारण आकाराला पूरक होते; तर ल् + व्ह + आ + ळ + ए यात द्रव व अर्धस्वर यांच्या संयोगामुळे लघु उच्चारण होते. 'ळ' ह्या द्रवामुळे पुढे 'ए' हा स्वर येऊनही उच्चारण लांबत नाही. 'झाडे' पेक्षा 'लव्हाळे' हे लिखितरूप मोठे असूनही उच्चारण परिणामकारक ठरून









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अर्थपोषक ठरते. 'महापुरे' ह्या शब्दातील सर्वच अक्षरांचे उच्चारण दीर्घ होते. म् + अ + ह् + आ + प् + उ + र + ए अधोरेखित चारही स्वरांच्या विवरणामुळे महापुराच्या महारूपाचा मनावर परिणाम होतो. 'महापुरात' ह्याऐवजी 'महापुरे' ह्या पद्यरूपामुळे हा परिणाम साधावयास मदत झाली. लिखित रूपात 'महापुरे' असे असले म्हणजे ऱ्हस्व 'पु' असले तरी, आसपासच्या ध्वनींच्या संबंधामुळे, ऱ्हस्व 'पु'चेही दीर्घोच्चारण होते. म्हणून महापुरात झाडे जातात (वाहून जातात) व लव्हाळी (टिकून) राहतात' ही घटना नवलाईची ठरते.

"मुंगी आणि राव। आम्हां सारखाच जीव।।"

ह्या रचनेत पहिल्या चरणात मुंगी व राव हे प्रतिपक्ष आहेत. एक कीटक व दुसरा मनुष्यप्राणी. सांकल्पनिक मांडणी करायची झाली तर ती अशी होईल.

**मुंगी** : – (मानुष) – (नर) – (प्रतिष्ठा)

**राव** : + (मानुष) + (नर) + (प्रतिष्ठा)

हा सांकल्पनिक अर्थभेद झाला. 'मुंगी'चे उच्चारण म्+उ+ङ्+ई असे होते. 'म' व 'ङ्' ही दोन अनुनासिके व उ व ई हे बहुतकरून संवरणात्मक उच्चारले जाणारे स्वर ('उ'चा उच्चार तर स्पष्टपणे संवरणात्मक आहे.) यामुळे 'मुंगी'चे लघुतम रूप प्रतीत होते. याउलट, 'राव'चे उच्चारण र्+आ+व = द्रव + विवरणात्मक उच्चार असलेला स्वर यामुळे 'रा' चे उच्चारण मुंगीच्या उच्चारणाच्या पार्श्वभूमीवर विवरणात्मक म्हणून स्पष्टपणे प्रतीत होते. पण 'आम्हा सारखाची जीव' असे दुसऱ्या चरणात येते व 'जीव'च्या लघुरूपात 'राव'चे दीर्घोच्चारित रूप विरघळून जाते. 'मुंगी आणि राव' हा एक पदसमूह व 'जीव' यांचे अंत्ययमकामुळे नाते जुळते. सजीवाच्या पातळीवर दोन्ही समान आहेत, हे जाणवणे तसे कठीण; पण तुकोबांना तसे जाणवते. ही संतदृष्टी आहे.

*"वितीएवढेसें पोट। केवढा बोभाट तयाचा।।"*

यात पोट = प्+ओ+ट्+अ व बोभाट = ब्+ओ+भ्+आ+ट्+अ अशी फोड केली की प् ह्या स्फोटकात 'ओ'कार मिसळतो व 'ट'च्या स्फोटकाने उच्चारणाची मर्यादा संपून 'पोटा'च्या रूपाला ध्वन्युच्चारण साहायक ठरते. 'बोभाट'चे उच्चारण करताना स्फोटकात 'ओ'कार मिसळून लगेच अर्ध-स्फोटक व 'आ'कार यांची जोड मिळते व 'ट' ह्या स्फोटकाच्या उच्चारणाने दीर्घोच्चारण संपते. 'ट' ह्या स्फोटकामुळे आंतर यमक साधले जाऊन त्यांचे परस्परविरोधी नाते प्रस्थापित होते व ते अर्थवाहक होते.

नमुना पहाणी म्हणून काही वचनांचे हे असे विश्लेषण केले. इतरही वचनांचे असे सार्थ विश्लेषण करता येऊ शकते.

"मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास। कठीण वज्रास भेंदू ऐसे।।" ह्या वचनाचे रचनावैशिष्ट्य पाहू. ह्या ओळीत दोन्ही चरणांची मांडणी प्रतिपक्षात्मक आहे. वाक्यविन्यासात्मक समांतर-न्यास (Syntactic Parallelism) असे त्याला म्हणता येईल. एका विष्णुदासाची ही दोन प्रतिपक्षात्मक लक्षणे आहेत म्हणून वाक्यविन्यासात्मक समांतर-न्यासाचे जसे हे उदाहरण म्हणता येईल तसेच 'द्विपदबंधन'चे (coupling) उदाहरण म्हणूनही प्रस्तुत ओळीचा विचार करता येईल.

तुकोबांच्या प्रतिपक्षात्मक मांडणीच्या रचनांकडे पाहिले की, काही गोष्टी स्पष्ट होतात. अशा प्रकारच्या रचनांमुळे मूलभूत विरोध, विसंगती यांचे दर्शन घडून विदारक सत्याचा प्रत्यय येतो. प्रतिपक्षात्मक मांडणीमुळे जाणीवजागृती होऊन आत्मभान येते. आत्मभानामुळे सत्याचा प्रत्यय येतो व हा अनुभव प्रतीतीचा आनंद देणारा असतो.

विश्लेषणासाठी घेतलेल्या तुकोबांच्या एकंदर सर्व वचनांकडे पाहिले तर अजून काही गोष्टी स्पष्ट होतात. खाली दिलेल्या काही वचनांचा विचार करू.

- *"जे का रंजले गांजले। त्यासि म्हणे जो आपुले।।*
  *तो चि साधु ओळखावा। देव तेथे चि जाणावा।।*
  *मृदु सबाह्य नवनीत। तैसे सज्जनाचे चित्त।।*
  *ज्यासि आपंगिता नाही। त्यासि धरी जो हृदयी।।*
  *दया करणे जे पुत्रासी। ते चि दासा आणि दासी।।*
  *तुका म्हणजे सांगू किती। तो चि भगवंताची मूर्ती।।*
- *"तुका म्हणे तो चि संत। सोसी जगाचे आघात।।"*
- *"पराविया नारी माऊली समान।*
  *परधनी वाटो नेदी मन।।"*
- *"बुडता हे जन न देखवे डोळा।*
  *येतो कळवळा म्हणउनि।।"*
- *"आम्ही वैकुंठवासी। आलों या चि कारणासी।।"*
- *"अर्भकाचे साटी। पंते हातीं धरिली पाटी।।*
  *तैसे संत जगी। क्रिया करूनी दाविती अंगीं।।"*







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

- *"बालकाचे चाली। माता जाणुनि पाउल घाली।।<br>तुका म्हणे नाव। जनासाटीं उदकीं ठाव।।"*
- *"रात्री दिवस आम्हा युद्धाचा प्रसंग।<br>अंतर्बाह्य जग आणि मन।।"*
- *"बोले तैसा चाले। त्याचीं वंदीन पाउले।।"*
- *"मुंगी आणि राव। आम्हां सारखाचि जीव।।"*
- *"सोने आणि माती। आम्हां समान हे चित्ती।।"*
- *"जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती।<br>देह कष्टिवती उपकारे।।"*
- *"भूतांची दया हे भांडवल संता।<br>आपुली ममता नाहीं देहीं।।"*
- *"सोने रूपे आम्हां मृत्तिके समान।<br>माणिके पाषाण खडे तैसे।।"*
- *"मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास।<br>कठीण वज्रास भेदू ऐसे।।"*

वरील सर्व वचने संतांची वैशिष्ट्ये स्पष्ट करणारी आहेत. जीवनाला कुठकुठल्या कसोट्या लागतात हे वरील वचनांमुळे तर कळतेच, पण कसोट्यांची प्रक्रिया ही किती खडतर आहे हेही कळते. संत ही खडतर प्रक्रिया पार पाडतात व कसोट्यांना उत्तीर्ण होतात. म्हणून इतरांना जागे करण्यासाठी, त्यांना संतपदवीला पोचविण्यासाठी अट्टहास करतात. प्रत्येक व्यक्ती यादृष्टीने समर्थ आहे. व्यक्तीच्या सामर्थ्याचे केंद्र म्हणजे मन. म्हणून तुकोबांच्या अवतरणांमध्ये मनासंबंधी बरीच वचने येतात. उदाहरणार्थ :

- *"मन करा रे प्रसन्न। सर्व सिद्धीचे कारण।।"*
- *"हालवूनि खुंट। आधीं करावा बळकट।।"*
- *"तुका म्हणे मना पाहिजे अंकुश।<br>नित्य नवा दिस जागृतीचा।।"*
- *"चित्त समाधानें। तरी विष वाटे सोने।।"*
- *"मनाच्या तळमळें। चंदनेंही अंग पोळें।।"*
- *"भंगलिया चित्ता। न ये काशाने सांदिता।।"*
- *"ठेविले अनंते तैसेचि राहावे।<br>चित्ती असो द्यावे समाधान।।"*
- *"नको नको मना गुंतू मायाजाळी।<br>काळ आला जवळी ग्रासावया।।"*

इत्यादी. अशा रीतीने संतपदाकडे वाटचाल करण्यासाठी 'मनाला प्रसन्न करणे' ही एक महत्त्वाची कसोटी तुकोबांनी सुचविली आहे. तुकोबांना 'विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म। भेदाभेद भ्रम अमंगळ।।' वाटत होते व 'आपणासारिखे करिती तात्काळ। न लगे काही वेळ तयालागी।।' अशी त्यांना खात्री होती.

तुकोबांची वचने ही व्यवहारात चलनी नाण्यांसारखी वापरली जातात. तुकोबांना अभिप्रेत असलेल्या अर्थाने ती वापरली जात नाहीत. वैखरी पातळीवरच्या व्यवहारामुळे हे शक्य होत नाही हे आपण पाहिले आहेच. तुकोबांची वचने सर्वसाधारणपणे कुठल्या अर्थाने वापरली जातात व तुकोबांना त्यांच्या महावाक्याच्या संदर्भात अभिप्रेत असलेला अर्थ यांची तुलना केल्यास उद्बोधक होईल.

**१. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*साच माझा देव्हारा। भाक ठेवा भाव खरा।<br>त्रिगुणाचा फुलवरा। आणा विनिति सांगतो।।<br>माझें दैवत हें रंगीं। नाचे वैष्णवांच्या संगीं।<br>भरलें मग अंगीं। निवाड करी दोहींचा।।ध्रु.।।<br><u>तुझें आहे तुजपासीं। परि तूं जागा चुकलासी।</u><br>चिवडुनिया नासी। तुझ्या घरिच्यांनी केली।।<br>आता न पडे ठावें। वांचूनिया माझ्या देवें।<br>अंधकार व्हावें। नासु ठाव शोधावा।।<br>आंधळ्यासी डोळे। देते पांगुळासी पाय।<br>वांजा पुत्र फळे। नवस पुरविते विठाई।<br>उगविली कोडीं। मागें कितेकांची वापुडीं।<br>तुका म्हणे घडी। न लगे नवस द्या आधीं।।*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**

'डांका' या शीर्षकाखाली तुकोबांचे जे आठ अभंग दिलेले आहेत, त्यातील हा एक अभंग. डांकेचे रूपक वापरून हा अभंग रचला आहे हे उघडच आहे. गोंधळासारखाच असलेला देवीच्या कुळधर्माचाच हा एक प्रकार आहे. गोंधळ हा गोंधळी घालतात; तर डांक कुंभार घालतात. डांक घालताना कुंभार डांक हे वाद्य वाजवून गोंधळ्याप्रमाणेच अनेक कथा सांगतात व कथागीते गातात. त्यांच्या कथागीते गाण्याच्या पद्धतीला अनुसरूनच ह्या रूपकात्मक अभंगांची रचना झालेली आहे. विठाबाई ही तुकोबांची देवी आहे. ती आंधळ्याला डोळे,






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पांगळ्याला पाय, वांझेला पुत्र देऊन नवस पुरविते. हे कथागीत गाणारा देवीचा भक्त कुंभार (म्हणजे तुकोबाच) आपला देव्हारा खरा आहे म्हणून इतरांना, त्यांनी खऱ्या भावाची प्रतिज्ञा बांधून व त्रिगुणांनी गुंफलेला फुलवरा घेऊन यावे, अशी विनंती करतो. हे सांगतानाच तो प्रत्येकात विश्वास निर्माण करण्याचा प्रयत्न करतो. हे सांगताना तो म्हणतो की, तुझी वस्तू तुझ्याजवळच आहे; पण तू जागा चुकलास. तुझ्या हृदयरूपी घरात कामक्रोधादी मंडळी शिरली व त्यांनी सारा चिवडून नाश केला. आता माझ्या देवावाचून तुला तुझ्या आत्मतत्त्वाचा-परतत्त्वाचा ठावठिकाणा सापडणार नाही. वस्तुतः ते तुझ्याजवळच आहे; पण तुझे वर्म चुकले आहे. म्हणून तू माझ्या देवीचा नवस फेड. इतरांनाही तुकोबा हेच आवाहन करतात.

**इ. चलनातील सर्वसाधारण अर्थ :**

वस्तू हरवल्याचा भास होण्याच्या घटनेपासून लोकांमध्ये असणाऱ्या कुठल्याही प्रकारच्या क्षमतेची कुठल्याही प्रसंगी जाणीव करून देण्यासाठी पु.ल. देशपांडे यांनी आपल्या एका तीन अंकी नाटकासाठी 'तुझे आहे तुजपाशी' ह्या तुकोबांच्या उक्तीचा वापर करून घेतला आहे.

**२. अ. तुकोबांचे महावाक्य व आतील अवतरणक्षम विधान :**

*आम्ही वैकुंठवासी। आलों या चि कारणासी।*
*बोलिले जे ऋषी। साच भावें वर्तावया।।*
*सांडूं संतांचे मारग। आडरानें भरलें जग।*
*उच्छिष्टाचा भाग। शेष उरलें तें सेवूं।।ध्रु.।।*
*अर्थे लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें।*
*विषयलोभी मन। साधनें बुडविलीं।।*
*पिटूं भक्तीचा डांगोरा। कळिकाळासी दरारा।*
*तुका म्हणे करा। जयजयकार आनंदें।। (५२०)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**

काही प्रतींत 'सांडूं संतांचे मारग' ह्या पाठाऐवजी 'झाडू संतांचे मारग' असा पाठ आहे. 'सांगू संतांचे मारग' असाही पाठ असावा; कारण साधुसंतांनी घातलेला मार्ग आम्ही सांगू. साधुसंतांनी सांगितलेला मार्ग सोडून जग हे आडरानात शिरले आहे. त्या जगाला सुविहित मार्गावर आणण्यासाठी आम्ही वैकुंठाचा वास सोडून खास इथे आलो आहोत. पूर्वी ऋषींनी जे सांगितले आहे त्याप्रमाणेच खरे वर्तन करण्यासाठी आम्ही मृत्युलोकात आलो आहोत. पुराणांचा जो खरा रहस्यार्थ होता तो अर्थ शब्दज्ञान्यांनी भलतेसलते अर्थ करून नष्ट केला. भक्तितत्त्व हे सर्वश्रेष्ठ आहे; पण शाब्दिकांनी पुराणांतील अर्थांना भलतीच वळणे दिल्यामुळे भक्तीशिवाय इतर गोष्टींनाच महत्त्व प्राप्त झाले. यासाठी कळिकाळालाही दरारा वाटायला लावणारी भक्ती कशी श्रेष्ठ आहे हे आम्ही पटवून देऊ व यासाठीच आमचा अवतार आहे.

**इ. चलनातला सर्वसाधारण अर्थ :**

मृत्युलोकातील आध्यात्मिक सोडून इतर कुठलेही छोटेमोठे काम, कार्य एखाद्याने पार पाडले तर त्याच्या गौरवासाठी 'आलो या चि कारणासी' ह्या वचनाचा हमखास वापर होतो. अनंतराव भालेराव यांच्या आत्मचरित्राचे शीर्षक 'आलो या चि कारणासी' असे आहे.

**३. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*<u>रात्री दिवस आम्हा युद्धाचा प्रसंग।</u>*
*अंतर्बाह्य जग आणि मन।।*
*जीवा ही आगोच पडती आघात।*
*येऊनियां नित्य नित्य करी।।*
*तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें।*
*अवघीयांचें काळें केलें तोंड।। (४०९१)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**

'रात्री दिवस आम्हा युद्धाचा प्रसंग' या ऐवजी 'रात्रंदिन ('किंवा रात्रंदिवस) 'आम्हा युद्धाचा प्रसंग' असा पाठ अधिक वापरला जातो. अर्थात समकालीन भाषा वापरून सुगमतेसाठी ही सोय केली जाते. तुकोबा या अभंगात आपला आध्यात्मिक अनुभव सांगतात. आत मन व बाहेर उपद्रवी जग यांच्याशी रात्रंदिवस युद्ध करण्याचा प्रसंग आमच्या वाट्याला आलेला आहे. जीवावर प्रचंड आघात पडतात. (मनापासून व जगापासून) व त्यांचे सारखे निवारण करावे लागते. तुकोबा म्हणतात की, देवा, तुझ्या नामस्मरणामुळे आलेल्या बळामुळे अवघ्यांचे तोंड काळे केले.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**इ. चलनातला सर्वसाधारण अर्थ :**
कुठल्याही प्रकारचे काम असो, ते उपसताना 'रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग' असे वर्णन केले जाते. कमल देसाई यांनी आपल्या एका कादंबरीसाठी वरील वचनाचा शीर्षक म्हणून वापर केला आहे.

**४. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*कोणी निंदा कोणी वंदा। आम्हां स्वहिताचा धंदा।।*
*काय तुम्हांसी गरज। आम्ही भजूं पंढरिराज।।ध्रु.।।*
*तुझ्यांसारिखें चालावें। तेव्हां स्वहिता मुकावें।।*
*तुका म्हणे हो कां कांहीं। गळ दिला विठ्ठल पायीं।।*
*(४३११)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**
पंढरीराजाचे भजन हे आमचे हित. तुमच्यासारखी लौककाचा कास धरून आम्ही चालू लागलो तर आम्ही अलौकिक अशा हितास मुकू. यामुळे कोणी निंदो अगर वंदो आम्ही आमच्या हिताच्या धंद्यापासून परावृत्त होणार नाही.

**इ. चलनातील सर्वसाधारण अर्थ :**
तुकोबांनी अलौकिकार्थाने स्वहिताचा धंदा अस म्हटले आहे. पांडुरंगाचे भजन हा अलौकिक अनुभव आहे; पण सामान्य माणसे लौकिक धंद्याला स्वहिताचा धंदा मानतात व त्यात त्यांचा स्वार्थ अभिप्रेत असतो.

**५. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*हालवूनि खुंट। आधीं करावा बळकट।।*
*मग तयाच्या आधारें। करणें अवघें चि बरें।।*
*सुख दुःख साहे। हर्षामर्षी भंगा नये।।*
*तुका म्हणे जीवें। आधी मरोनि राहावें।। (१८४९)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**
"हालवूनि खुंट। आधीं करावा बळकट" ह्या ओळीत 'लोकोक्ती' अलंकार असून 'स्थाणुनिखनन्याय' आहे, हे आपण यापूर्वीच पाहिले आहे. लोकोक्तीचा वापर करून तुकोबा खुंटासारखे मन बळकट करावे असे म्हणतात. खुंट हालवून बळकट केला की भीती नसते; तसेच मन दृढ झाले की, ते सुखदुःख, हर्षामर्ष समानत्वाने सोसू शकते व ते विचलित होऊ शकत नाही अगर भंग पावू शकत नाही.

**इ. चलनातील सर्वसाधारण अर्थ :**
पूर्णपणे लौकिक अर्थाने वापर केला जातो. व्यवहारातील बोली पक्की करणे असो किंवा एखादा निश्चय असो, वरील वचन वापरले जाते.

**६. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*याजसाटीं केला होता अटाहास।*
*शेवटाचा दिस गोड व्हावा।।*
*आता निश्चितीनें पावलों विसांवा।*
*खुंटलिया धांवा तृष्णेचिया।।ध्रु.।।*
*कवतुक वाटे जालिया वेचाचें।*
*नाव मंगळाचें तेणें गुणें।।*
*तुका म्हणे मुक्ति परिणिली नोवरी।*
*आतां दिवस चारी खेळीमेळीं।। (१३२८)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**
शेवटचा दिवस गोड व्हावा म्हणजे अंतकाळीदेखील परमेश्वराचे चिंतन घडून देह पडावा यासाठी आयुष्यभर भगवद्भक्तीचा खटाटोप केला. आता निश्चिंत झालो आहे. तृष्णेची धाव खुंटली आहे. हरीच्या परम मंगल नामस्मरणात आयुष्य घालविले त्याचे खूप कौतुक वाटत आहे. तुकोबा म्हणतात की; मी मुक्तीशी लग्न लाविले असून तिच्याशी खेळीमेळीने उरलेले चार दिवसही जातील.

**इ. चलनातील सर्वसाधारण अर्थ :**
एखादा ऐहिक लाभ व्हावा यासाठी उठाठेव करणे, व त्या लाभाच्या प्राप्तीचा दिवस हा शेवटचा दिवस. ऐहिक लाभ ज्या दिवशी झाला तो शेवटचा दिवस त्यादृष्टीने गोड होणे.

**७. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*मोलें घातलें रडाया। नाहीं असुं आणि माया।*
*तैसा भक्तिवाद काय। रंगबेगडीचा न्याय।।ध्रु.।।*






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

*वेठी धरिल्या दावी भाव। मागें पळायाचा पाव।।*
*काजव्याच्या ज्योती। तुका म्हणे न लगे वाती।। (२४९७)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**
मोलाने रडावयास लावलेल्या व्यक्तीस अश्रू येत नाहीत व त्याच्या अंतःकरणात मायाही नसते. हरीबद्दल प्रेम नाही व भक्तीबद्दल बोलतो आहे तर त्याचे बोलणे हे बेगडीच्या चकाकीप्रमाणे असते. वेठबिगार हा जसा ओझे टाकून त्याच पावली मागे फिरतो तसा बळजबरीचा भक्तिभाव हा काही कामाचा नसतो. काजव्याच्या ज्योतीवर वात पेटवायला गेल्यावर ती पेटत नाही; कारण काजव्याचा प्रकाश अगर काजव्याची ज्योत ह्या काही खऱ्या गोष्टी नव्हेत. म्हणून अंतःकरणात प्रेम नसताना केलेली भक्ती ही हरिप्राप्ती करून देऊ शकत नाही.

**इ. चलनातला सर्वसाधारण अर्थ :**
एखाद्याच्या अंतःकरणात मुळीच प्रेम नसते; पण तो खूप प्रेम आहे, असा बहाणा करीत असतो. अशा वेळी त्याच्या प्रेमाचे उपहासात्मक वर्णन करण्यासाठी 'मोले घातले रडाया। नाहीं आसू नाही माया' या वचनाचा वापर केला जातो.

**८. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*वांझेनें दाविले गऱ्हवार लक्षण।*
*चिरगुटें घालुन वाथयाला।।*
*तेवी शब्दज्ञानी करिती चावटी।*
*ज्ञान पोटासाठी विकूनियां।।*
*बोलाचि च कढी बोलाचा चि भात।*
*जेवूनियां तृप्त कोण जाला।*
*कागदी लिहितां नामाची साकर।*
*चाटिता मधुर गोडी नेदी।।*
*तुका म्हणे जळो जळो ते महंती।*
*नाहीं लाज चित्तीं आठवण।। (३८७१)*

**आ. तुकोबांच्या वचनाचा महावाक्यांतर्गत अर्थ :**
कोरड्या ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी करणारा जो शब्दज्ञानी असतो त्याच्या कोडगेपणावर तुकोबांनी कोरडे आढले आहेत. यासाठी विविध उदाहरणे दिली आहेत. पोटाला वस्त्रे बांधून गर्भारपणाची लक्षणे दाखविणारी वांझ स्त्री ही जशी खोटी तद्वत बोलाचीच कढी व बोलाचाच भात याने कोणाचेच जेवण होऊ शकणार नाही. कागदावर साखर अशी अक्षरे लिहून ती चाटली की ती गोडी देऊ शकणार नाहीत, त्याप्रमाणे शब्दज्ञान्यांचे ज्ञान हे अनुभूतिशून्य असते. ते केवळ धंदेवाईक असतात.

**इ. चलनातील सर्वसाधारण अर्थ :**
एखादा वाचाळ पण कृतिशून्य असतो. आश्वासनांची खैरात करणारा पण त्यांची कधीच पूर्ती न करू शकणाराही कोणी असतो. अशा मंडळींचे, म्हणजे त्यांच्या वाचाळपणाचे वर्णन करण्यासाठी वरील अधोरेखित वचन वापरले जाते.

**९. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*माझियें जातीचें मज भेटो कोणी।*
*आवडीची धणी फेडावया।।*
*आवडे ज्या हरि अंतरापासूनी।*
*ऐसियांचे मनीं आर्त माझे।।ध्रु.।।*
*तयालागी जीव होतो कासावीस।*
*पाहातील वास नयन हे।।*
*सफळ हा जन्म होईल तेथून।*
*देतां आलिंगन वैष्णवांसी।।*
*तुका म्हणे तोचि सुदिन सोहळा।*
*गाऊं या गोपाळा धणीवरि।। (२००६)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**
तुकोबांच्या जातीचे म्हणजे परमात्म्याची अंतःकरणापासून आवड असलेले. अशा वैष्णवांच्या भेटीसाठी तुकोबा आसुसलेले आहेत. त्यांना आलिंगन दिल्याने हा जन्म सफळ होईल असे तुकोबांना वाटते. एका अलौकिक अनुभवाचे प्रेय प्राप्त व्हावे यासाठी तुकोबा वरील महावाक्य उद्गारतात.

**इ. चलनातील सर्वसाधारण प्रचलित अर्थ :**
पूर्णतः लौकिक अर्थाने वरील अधोरेखित वचन वापरले जाते. पण लौकिकार्थातही क्षुल्लक कारणांसाठी 'माझिये जातीचे मज भेटो कोणी' असे म्हटले जाते – समान व्यसन, समान छंद, समान स्वार्थ यादृष्टीनेही वरील वचनाचा वापर होतो.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**११. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम वचन :**

*हें चि दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा।।*
*गुण गाईन आवडी। हे चि माझी सर्व जोडी।।ध्रु.।।*
*न लगे मुक्ति आणि संपदा। संतसंग देईं सदा।।*
*तुका म्हणे गर्भवासीं। सुखे घालावें आम्हासी।। (२३०६)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**

परमेश्वराचे गुणगान करणे हीच तुकोबांची सर्व जोडी म्हणजे कमाई आहे. संतसमागमापुढे तुकोबांना मुक्ती आणि संपत्तीही तुच्छ वाटते. तेव्हा परमेश्वराचे सतत स्मरण करण्याचे दान व संतसमागम यासाठी परमेश्वराने गर्भवासात घालावे, अशी तुकोबा इच्छा व्यक्त करतात.

**इ. चलनातील सर्वसाधारण प्रचलित अर्थ :**

कर्तृत्ववान व्यक्तींचा गौरव करताना, जिवलग स्नेही वगैरेंसंबंधी बोलताना, लिहिताना अधोरेखित वचनाचा वापर केला जातो. पु.ल. देशपांडे यांच्या एका पुस्तकाचे शीर्षक 'गुण गाइन आवडी' असे आहे.

**१२. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम वचन :**

*बोलिलीं लेंकुरें। वेडीं वांकुडीं उत्तरें।।*
*करा क्षमा अपराध। महाराज तुम्ही सिद्ध।।*
*नाहीं विचारिला। अधिकार म्यां आपुला।।*
*तुका म्हणे ज्ञानेश्वरा। राखा पायांपें किंकरा।। (२३३४)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**

तुकोबांनी ज्ञानोबांशी साधलेला संवाद वरील अभंगात आलेला आहे. तुकोबा स्वतःला लेकरू म्हणवून घेतात व काही वेडेवाकडे भाषण झाले असेल, अधिकारातिक्रमण झाले असेल तर क्षमा करा, अशी ज्ञानदेवांपाशी विनंती करतात व ज्ञानदेवांनी मज सेवकाला पायांजवळ ठेवून रक्षण करावे अशी विनवणी करतात. ज्ञानदेव हे सिद्ध व ज्ञानी असल्याचाही गौरव तुकोबा करतात.

**इ. चलनातील सर्वसाधारण अर्थ :**

सर्वसाधारणपणे भाषणाच्या अखेरीस वक्ते श्रोत्यांना उद्देशून वरील अधोरेखित वचनाचा वापर करतात. श्रोत्यांना महाराज, सिद्ध वगैरे शब्दांनी गौरविले जाते.

**१३. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*वेडें वांकडें गाईन। परि मी तुझा चि म्हणवीन।।*
*मज तारीं दिनानाथा। ब्रीदें साच करीं आतां।।*
*केल्या अपराधांच्या राशी। म्हणऊनि आलों तुजपाशीं।।*
*तुका म्हणे मज तारीं। सांडीं ब्रीद नाहींतरीं।। (२७६७)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**

तुकोबा परमेश्वराशी संवाद साधतात. देवा, माझी भक्ती वेडीवाकडी असेल, मी तुझ्या नामाचे गायन वेड्यावाकड्या पद्धतीने करीत असेन; पण मी स्वतःला तुझाच म्हणवितो व म्हणवीन. देवा, तू मला तार व दीनानाथ हे तुझे ब्रीद खरे कर. मी अपराधांचे डोंगर रचले आहेत व त्यांचा परिहार व्हावा म्हणून मी तुझ्याकडे आलो आहे. तू माझा उद्धार कर; नाहीतर दीनानाथ हे ब्रीद तरी सोडून दे.

**इ. चलनातील सर्वसाधारण अर्थ :**

तुकोबा परमेश्वराला उद्देशून 'वेडे वाकडे गाईन। परि मी तुझाच म्हणवीन' असे म्हणतात. तुकोबांचा हा अलौकिक आध्यात्मिक अनुभव आहे. सामान्य माणसे आपणापेक्षा वरिष्ठ अगर सत्ता धारण केलेल्या अधिकारारूढ व्यक्तींच्या गुणगौरवासाठी व त्यांच्याशी निकटतम नाते प्रस्थापित करण्यासाठी वरील अधोरेखित वचनाचा वापर करतात.

**१३. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*नका दंतकथा येथें सांगों कोणी।*
*कोरडे ते मानी बोल कोण।।*
*अनुभव येथें व्हावा शिष्टाचार।*
*न चलती चार आम्हांपुढे।।ध्रु.।।*
*निवडी वेगळें क्षीर आणि पाणी।*
*राजहंस दोन्ही वेगळालीं।।*
*तुका म्हणे येथें पाहिजे जातीचें।*
*येरा गबाळाचें काय काम।। (३१२८)*









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**
तुकोबांना इथे 'जातीचे पाहिजे' ह्या म्हणण्यातून खरा, अंतरी आत्मनिष्ठ असा साधू अभिप्रेत आहे; येरागबाळा नव्हे. ब्रह्मज्ञानाच्या कोरड्या दंतकथा सांगणारे, अनुभवशून्य नको आहेत व त्यांच्या कथा-दंतकथाही नको आहेत.

**इ. चलनातील सर्वसाधारण अर्थ :**
कुठलेली सर्वसाधारण कौशल्य असलेल्या माणसाची वाहवा करण्यासाठी वरील वचनाचा वापर केला जातो.

**१४. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*शुद्धबीजा पोटीं। फळें रसाळ गोमटीं।।*
*मुखीं अमृताची वाणी। देह वेचावा कारणीं।।ध्रु.।।*
*सर्वांगीं निर्मळ। चित्त जैसें गंगाजळ।।*
*तुका म्हणे जाती। ताप दर्शनें विश्रांती।। (६२)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**
ज्याच्या मुखात अमृताची वाणी आहे, ज्याचा देह परोपकारासाठी झिजतो, जो सर्वांगांनी निर्मळ आहे व ज्याचे चित्त गंगेच्या पाण्याप्रमाणे निर्मळ आहे, अशा परमेश्वराच्या भक्ताच्या दर्शनाने ताप जाऊन विश्रांती मिळते. ज्या भक्ताचे अंतःकरण शुद्ध असते, अशा भक्ताच्या एकूण एक कृतीतून रसाळ व उत्तम अशीच फळे येतात.

**इ. चलनातील सर्वसाधारण अर्थ :**
खूप सैलसरपणे वरील अधोरेखित विधानाचा वापर होतो. मनःपूर्वकतेने एखादी कृती केली तर तिचा परिणाम हा यशदायी असतो हे पटविण्यासाठी किंवा अन्य तत्सम उदाहरणासाठी प्रस्तुत विधानाचा वापर केला जातो.

**१५. अ. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान :**

*करविली तैसी केली कटकट।*
*वांकडें कीं नीट देव जाणे।।*
*कोणाकारणें हें जालेंसे निर्माण।*
*देवाचें कारण देव जाणे।।*
*तुका म्हणे मी या अभिमाना वेगळा।*
*घालूनि गोपाळा भार असें।। (२३४६)*

**आ. तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ :**
तुकोबा आपल्या काव्यनिर्मितीसंबंधात वरील महावाक्य उद्गारतात. तुकोबा काव्यनिर्मितीच्या अभिमानाहून वेगळे राहून देवावरच हा सर्व भार घालतात. आपली काव्यनिर्मिती वाकडी की सरळ हे जाणता परमेश्वरच जाणू शकतो. तुकोबांच्या दृष्टीने परमेश्वराचे स्तवन महत्त्वाचे.

**इ. चलनातील सर्वसाधारण अर्थ :**
कुठलेही काम पूर्ण झाले की त्याबद्दलची कृतकृत्यता व्यक्त करण्यासाठी बहुतेक वक्ते आपल्या भाषणांच्या अखेरीस वरील चरणांचा वापर करतात.

वरील तुलनात्मक विवेचनावरून काही गोष्टी स्पष्ट होतात. तुकोबांची अलौकिक आध्यात्मिक अनुभव व्यक्त करणारी महावाक्ये मराठी भाषक समाजाकडून लौकिक अनाध्यात्मिक अनुभव व्यक्त करण्यासाठी वापरली जातात. आपल्या लौकिक कृतींना भव्य परिमाण लाभावे व आपणांस कृतकृत्य वाटावे यासाठी तुकोबांच्या मुखाने — तुकोबांची भाषा — वापरून आपला अनुभव व्यक्त करण्याची धडपड होते. यात सामान्यांपासून विद्वानांपर्यंत, वृत्तपत्रीय लेखन करणाऱ्यापासुन साहित्यनिर्मिती करणाऱ्या लेखकापर्यंत सर्वांचा सहभाग असतो. म्हणून ग्रंथांची अन्वर्थक शीर्षके, सभासमारंभातील भाषणे, दैनंदिन व्यवहारातील सामान्य संभाषणे, अग्रलेखांची शीर्षके, ग्रंथांचे उपोद्घात, उपसंहार यासाठी व अशा इतर कितीतरी कारणांसाठी तुकोबांची भाषा वापरली जाते. याचा एक नमुना : मोरो केशव दामले या लेखकाने आपल्या ग्रंथाचा उपसंहार करण्यासाठी एकाचवेळी तुकोबांच्या तीन अभंगांचा — महावाक्यांचा — वापर केला आहे. आपल्या *शास्त्रीय मराठी व्याकरण* या ग्रंथाचा उपसंहार करताना दामले लिहितात[१४] —

"...बाकीचें तुकारामबोवांचे पुढील शब्दांत पहावे.

*"करविली तैशी, केली कटकट।*
*वाकुडें कीं नीट, देव जाणें।।*
*कोणा कारणें हें जालेंसे निर्माण।*
*देवाचें कारण, देव जाणें।।*
*तुका म्हणे मी या, अभिमानावेगळा।*
*घालूनि गोपाळा, भार असें।।*





अनुक्रमणिका
मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मग ही कटकट चालली असता जी वृत्ति होती ती –

*"निवडावे खडे।। तरी दळण वोजें घडें।।*
*नाही तरी नासोनि जाय।।*
*कारण आळस उरे हाय।।*
*निवडावे तण। सेतीं करावें राखण।।*
*तुका म्हणे नीत। न विचारितां नव्हे हित।।*

तेव्हा आता पुढील शब्दांनी वाचकांचा निरोप घेतो :

*सकळिकांच्या पायां, माझी विनवणी।।*
*मस्तक चरणी ठेवीतसें।।*
*अहो श्रोते, वक्ते सकळही जन।।*
*बरें पारखून बांधा गांठीं।।*
*फोडिले भांडार, धन्याचा हा माल।।*
*मी तंव हमाल, भारवाही।।*
*तुका म्हणे चाली, जाली चहुं देशी।।*
*उतरला कसीं, खरा माल।।"*

असा हा अवतरणक्षमतेचा विचार केला. तुकोबांचेच शब्द वापरून म्हणता येईल :

*"अक्षरांचा श्रम केला। फळा आला तेणे तो।।"*

**संदर्भ व टिपा :**

१. रा.ग. जाधव, *आनंदाचा डोह*, १९७६, वाई, पृ. २०-४१.
२. वि. भि. कोलते, *प्राचीन मराठी साहित्य संशोधन*, १९६८, पुणे, पृ. १०८.
३. "It is no wonder that hundreds of his utterances received the status of proverbs in Marathi, as they combine movements of great lyrical beauty, stark realism underlying them.", "...scholars quote his pointed saying to support their arguments. Orators use his lines to charm the peasantry. Several Marathi novels and plays derive their titles from Tukaram's idioms." – Bhalchandra Nemade, *Tukaram*, 1980, New Delhi, pp. 50 and 59 (respectively)
४. दिलीप पुरुषोत्तम चित्रे, *पुन्हा तुकाराम*, १९९०, पुणे, पृ. २८४.
५. जाधव, उनि., पृ. २३.
६. ग.त्र्यं. देशपांडे, 'दैवी वाक् – स्वरूप, सामर्थ्य, प्रयोजन', *संशोधनाची क्षितिजे*, संपा., भा.ल. भोळे, १९८५, नागपूर, पृ. ८७.
७. तत्रैव, पृ. ९०.
८. ग.त्र्यं. देशपांडे, *भारतीय साहित्यशास्त्र*, १९८०, मुंबई, पृ. १७९.
९. देशपांडे, उनि. पृ. ९२.
१०. सुधीर रसाळ, *कविता आणि प्रतिमा*, १९८२, मुंबई, पृ. १७५.
११. अशोक रा. केळकर, *वैखरी : भाषा आणि भाषाव्यवहार*, १९८३, मुंबई, पृ. ६.
१२. ह्या मुद्याच्या संदर्भात दुर्गा भागवत यांचे विवेचनही लक्षात घ्यावे, त्या म्हणतात, "...प्रास व पद्यबंध हे म्हणींचे आवश्यक तंत्र जगभर कसे ठरून गेल्यासारखे दिसते. इतकेच नव्हे, तर प्राचीन भाषांतून नव्या भाषा जेव्हा एखादी भाषा उचलतात, तेव्हा तिला पदबंधाचे स्वरूप येईल अशी दक्षता नेहमी भाषांतरकार घेत असतो. उदाहरणार्थ, 'मूलं प्रकृतिमापन्नः' हा महाभारतातला वाक्यसंप्रदाय पाहा. 'मूळ पदावर येणे' हे त्याचे सर्वसाधारण व्यवहारी गद्य स्वरूप. पण तुकारामाने 'मूळ स्वभाव जाईना' असे त्याचे पद्यात्मक रूपांतर केले आहे." - दुर्गा भागवत, *लोकसाहित्याची रूपरेखा*, १९७७, पुणे, पृ. ३०१.
१३. यासंदर्भात ग.त्र्यं. देशपांडे यांचे विवेचन पुढीलप्रमाणे – "प्राचीन अलंकारग्रंथातून दिलेले अर्थालंकाराचे प्रकार हे वाच्यवैचित्र्याचे प्रकार म्हणून दिलेले असतात. ज्या स्वरूपात ते दिलेले असतात त्याच स्थितींत त्यांच्या ठिकाणी अलंकारत्व नसते. ते जेव्हा रसाचे अभिव्यंजक म्हणून काव्यात उपयोजिले जातात तेव्हाच त्यांच्या ठिकाणीं अलंकारत्व येते आणि रसाला उपकारक होऊं शकणारे वाच्यप्रकार या दृष्टीनेच त्यांना अलंकार म्हणून संबोधण्यात येतें." ह्या मजकुराला तळटीप दिली आहे. तळटिपेतील मजकूर असा : "याकरिताच प्रत्येक अलंकाराच्या बाबतीत 'वैचित्र्ये सति' हें गृहीत धरावें लागतें 'वैचित्र्ये सति सादृश्यमुपमा', 'वैचित्र्ये सति संशयः ससन्देहः'। वैचित्र्य हें अलंकाराचें सामान्य लक्षण आहे, (वैचित्र्यमलङ्कारः - का.प्र.) त्या त्या वाच्यप्रकार-विशेषांत वैचित्र्य अनुगत न झालें तर त्याला अलंकारत्व येणारच नाही." – देशपांडे, *भारतीय साहित्यशास्त्र*, १९८०, मुंबई, पृ. ४०६.
१४. मोरो केशव दामले, *शास्त्रीय मराठी व्याकरण* संपादक, उपन्यास लेखक : कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर, १९७०, पुणे, पृ. ०१०६-०१०७.

●●






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# जयप्रकाश नारायण : काही संस्मरणे

**देवदत्त दाभोलकर**

जयप्रकाशजींचा आणि माझा तसा निकटचा संबंध कधीच आला नाही. माझे व्यक्तिगत नाव तर त्यांच्या स्मरणकोषात कधी होते, वा असेल असेही मला वाटत नाही. परंतु जो काही थोडा जवळून व काही दूरान्वयाने संबंध आला त्याचे मला एकूण सामाजिक संदर्भातही महत्त्व वाटते. म्हणूनच केवळ माझी संस्मरणे मी येथे नमूद करीत आहे.

(१) वर्ष १९५५ असावे. जगन्नाथपुरीला सर्वोदय संमेलन भरले होते. मी कुतूहल व काहीसा समभाव म्हणून प्रेक्षक या नात्याने तेथे गेलो होतो. टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सचे त्या काळातील विद्यार्थी श्री. ज.शं. आपटे व त्यांचे मित्र-सहकारी श्री. भाऊ पटवर्धनही तेथे आले होते. ते भूदान आंदोलनाचा अभ्यास करीत होते. आम्हा तिघांनाही सर्व सेवा संघाच्या सुमारे तीसएक जणांच्या सर्वोच्च स्तरीय बैठकीला निरीक्षक म्हणून उपस्थित राहण्याची अनुमती मिळाली होती.

अध्यक्षस्थानी अर्थातच विनोबाजी होते. जयप्रकाशजीही बैठकीत तसे सर्वप्रमुख होते.

प्रत्येकाने वर्षभरात आपण काय केले याचा अहवाल निवेदन केला. दामोदरदास मुंदडाजींनी आपल्या कामाचा अहवाल दिला. काम खूप होते. परंतु त्यात भूदानकार्य कमी असावे. त्यांचे निवेदन संपल्यावर विनोबाजी म्हणाले : "दामोदरने आता जे सांगितले त्यात जर माझी परीक्षा घेतली तर मला उत्तीर्ण होण्यासाठी लागणारे पस्तीस टक्के गुण देखील मिळणार नाहीत. कारण तो काय म्हणतो इकडे माझे लक्ष नव्हते. माझे सर्व लक्ष भूदानकार्यावर केंद्रित झाले आहे." (हे सर्व अर्थात हिंदीतच चालले होते.) यातून नंतर चर्चेत विनोबाजी इतके रागावले की, ते बैठक सोडून निघून गेले. सगळेजण अवाक् होऊन स्तब्ध बसले. नंतर जयप्रकाशजी उदास स्वरात स्वतःशीच बोलल्याप्रमाणे म्हणाले : "बाबा तो मन्त्र जानते है। तन्त्र हम लोगों को करना पडता है।"

जयप्रकाशजींची त्यावेळी मांडी घालून बसलेली बैठक, त्यांचा तो उदास आवाज व त्यांचे ते शब्द मला अजूनही Video-tape केल्याप्रमाणे जसेच्या तसे आठवतात. त्यानंतर अनेक दशकांनी दामोदरदासजींच्या निधनाच्या आधी काही वर्षे दामोदरदासजींची पुन्हा भेट झाली. मी त्यांना हे सांगितले व विचारले : 'माझे हे स्मरण बरोबर आहे ना?' त्यांच्या अर्थातच ते अधिक लक्षात राहिले होते. "हो, अगदी बरोबर आहे." ते म्हणाले. (याचा एक उत्तरार्ध आहे. तोही विनोबाजींच्या संदर्भात लक्षणीय आहे. परंतु तो शेवटी तळटीपेत देणे लेखाच्या बांधणीच्या दृष्टीने उचित होईल.)

(२) माझे दुसरे संस्मरण तीन दशकांपूर्वीच्या बिहार दुष्काळाच्या काळातील आहे. सांगली जिल्हा बिहार दुष्काळ निवारण समितीचा मी कार्याध्यक्ष होतो. आपण पाठवलेल्या निधीचा नीट वापर होतो याची हमी काय, असा या संबंधातील नेहमीचा ठेवणीतील प्रश्न एकाने उपस्थित केला. मी सरळ जयप्रकाशजींच्याकडे पत्र लिहून विचारणा केली. त्यांचे व्यथित अंतःकरणाचे मला उत्तर आले. 'याचा सर्व नीट विनियोग होत आहे, असा विश्वास तुम्ही बाळगा' असे जयप्रकाशजींनी लिहिले होते. ते पत्र मी बैठकीत वाचून दाखवले. जयप्रकाशजींना ही व्यथा मी का दिली असा दोषही मला इतर सभासदांनी दिला. काही स्थानांवर काही दोष पत्करावे लागतात. परंतु त्यांच्या भावनेशी मी सहमत होतो.

(३) तिसरे संस्मरण माझ्या सांगलीच्या कालखंडातीलच आहे. बहुधा १९६८ साल असावे. सांगलीचे उत्साही सर्वोदयी कार्यकर्ते शिखरे वैद्य एके दिवशी सकाळी माझ्याकडे आले. मला म्हणाले, "सर्वोदयाच्या बैठकीला गेलो होतो व पुढील वरिष्ठ बैठक सांगलीला घेणार असाल व जयप्रकाशजी येणार असतील तर एक लाख रुपये जमवून देईन, असे सांगितले. सर्वांनी ते आमंत्रण स्वीकारले आहे."

मी म्हणालो, "हे ठीक आहे; परंतु माझा यात काय संबंध?"

"यासाठी आपण एक समिती स्थापन करावयाची आहे व त्या समितीचे तुम्ही कार्याध्यक्ष व्हावयाचे आहे." त्यांनी खुलासा केला.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मी म्हणालो, "मी पाच हजारही कधी गोळा केले नाहीत. कोणाकडे पैसे मागणे माझ्या प्रकृतीत बसत नाही."

परंतु शिखरे यांच्या व्यक्तिमत्त्वाविषयी माझ्या मनात गाढ स्नेहादर होता. (याविषयीही खरे तर तळटीप क्र. २ हवी.) शेवटी त्यांच्या आग्रहापुढे मला मान तुकवावी लागली.

माझ्या शरणागतीनंतर ते म्हणाले, "आपण वसंतदादा पाटील यांना समितीचे अध्यक्ष करायचे." आम्ही दोघे दादांच्याकडे गेलो. त्यांनी तत्काळ मान्यता दिली. ते म्हणाले, "जयप्रकाशजींशी आमचे मतभेद जरूर आहेत. परंतु ते राष्ट्राचे मोठे नेते आहेत. मी अगत्य अध्यक्ष होईन."

जयप्रकाश नारायण सत्कार समितीची स्थापना झाली. सर्वोदय वरिष्ठ समितीची बैठक सांगलीला झाली. जयप्रकाशजी आले. एक लाख रुपये आम्ही जमवू शकलो नाही. परंतु जयप्रकाशजींच्या ६८व्या वाढदिवसानिमित्त अडुसष्ट हजार रुपयांची थैली त्यांना अर्पण करण्यात आली.

पाच-सहा दिवस जयप्रकाशजी व प्रभावतीदेवी सांगलीत होत्या. त्यांच्या निवासाची व्यवस्था आमच्या महाविद्यालयाच्या अतिथिगृहातच केली होती. सुमन त्या व्यवस्थेकडे पहात होती व नरेन्द्र स्वयंसेवक म्हणून त्या व्यवस्थेत मदत करीत होता. तो त्यावेळी मिरज मेडिकल कॉलेजचा विद्यार्थी होता.

मोठ्या माणसांचा अकारण वेळ घेणे मला जमत नाही; रुचतही नाही. त्यामुळे जयप्रकाशजींच्या जवळ व्यक्तिगतरीत्या जाण्याचा प्रयत्न मी केला नाही. शेवटी निघायच्या आदल्या दिवशी संध्याकाळी तेच मला म्हणाले, "आपण थोडे फिरायला जाऊ." मी त्यांना घेऊन आमच्या चिंतामणराव वाणिज्य महाविद्यालयाच्या मैदानावर गेलो. आम्ही दोघेजणच होतो.

मी त्यांना म्हटले, "मला आपल्याला एक प्रश्न विचारावयाचा आहे. आपल्याला तो उचित वाटला नाही आणि आपण त्याचे उत्तर दिले नाही तरी हरकत नाही. परंतु, डॉ. राम मनोहर लोहियांनी म्हटले आहे की, 'फाळणीच्या वेळी तुम्ही सर्वजण भ्याड ठरलात'. जयप्रकाशजी मला म्हणाले, "I have not read what Lohia has said, but if he has said this, it is not true. We were prepared for the ultimate sacrifice but Bapuji advised us, 'अब, हाऊस डिव्हाइड मत करो.' "

हे सर्व जयप्रकाशजींच्या शब्दांत अक्षरशः अजूनही माझ्या पक्के स्मरणात आहे.

ते चार-पाच दिवस आमच्या आयुष्यात फारच मोलाचे होते. माझी संस्कारक्षमता मर्यादित आहे. परंतु सुमन व नरेन्द्र यांच्या जीवनाला तो अनुभव प्रभावी स्पर्श करून गेला. परत निघताना जयप्रकाशजींनी आमच्या घरासमोर मुद्दाम गाडी थांबवून मला निरोपासाठी बोलावून घेतले व निघतानिघता 'कुछ बनो' असे सांगितले. ते त्यांचे शब्द मला दोन-तीन दिवस अस्वस्थ करीत होते, अशा आशयाचे विधान नरेन्द्रने *संकल्प* या अशा कार्यकर्त्यांच्या निवेदन-संग्रहाच्या पुस्तकातील आपल्या लेखात केले आहे.

यापुढची संस्मरणे आणीबाणीच्या कालखंडात मी कुलगुरू असतानाच्या कालावधीतील आहेत. पहिले जयप्रकाशजींशी अप्रत्यक्ष संबंध असलेले, तर दुसरे प्रत्यक्ष संबंध असलेले.

मी फर्ग्युसनचा प्राचार्य असताना एके दिवशी रात्री साडेदहाच्या सुमारास शरदरावजी पवार यांचा मला फोन आला. ते त्यावेळी शिक्षणमंत्री होते.

'अभिनन्दन.'

'कशासाठी?'

'पुणे विद्यापीठाची जबाबदारी तुमच्यावर सोपवावयाचे ठरले आहे. कुलपतींची आज सही झाली आहे.'

मी माझा यथायोग्य आनंद व्यक्त केला. दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशी शरदरावजींचा परत फोन आला. "तुम्हांला उद्या मला मुंबईत येऊन भेटता येईल का?"

मी भेटलो. ते मला म्हणाले, "तुमच्याविषयी काहीजणांचा असा आक्षेप आहे की, तुम्ही जयप्रकाशजींच्या बाजूचे आहात."

मी म्हणालो, "मी जयप्रकाशजींना फार मानतो ही गोष्ट तर खरीच आहे. यामुळे तुमचा निर्णय तुम्हांला बदलावयाचा असल्यास तुम्ही आजही बदलू शकता."

शरदरावजी म्हणाले, "तसा प्रश्न नाही. काल या संदर्भात मुख्यमंत्री वसंतराव नाईक, वसंतदादा पाटील व यशवंतराव चव्हाण यांची बैठक झाली. वसंतराव नाईक तर तुम्हांला ओळखत नाहीत परंतु दादा आणि यशवंतरावजी या दोघांनीही सांगितले – 'दाभोलकरांना आम्ही पूर्णपणे ओळखतो. ते कोणाहीसाठी आपली मते बदलणार नाहीत परंतु आपल्या स्थानाचा दुरुपयोगही करणार नाहीत.'

शासनाच्या बाजूने मला येथे हेही नमूद करणे आवश्यक वाटते की, संपूर्ण आणीबाणीच्या कालखंडात शासनाची


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

माझ्यावर योग्य ती नजर असली तरी कोणीही प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष माझ्यावर कसलाही दबाव आणण्याचा प्रयत्न केला नाही. इंदिराजींना याच कालखंडात मी स्वहस्ताक्षरात माझे परखड मत कळविले होते व त्यामुळे त्या नाराज होत्या असे त्यांच्या वर्तुळातीलच एकाने मला सांगितले होते. असे असतानाही हे घडले हे विशेष.

शासनाचा दबाव वेगळा. घरचा दबाव आणखी वेगळा होता. सुमनची अपेक्षा मी राजीनामा द्यावा अशी होती. मुलगा प्रसन्न तर सत्याग्रह करून तुरुंगात गेला होता. घरात माझे मूल्य जवळपास शून्यावर आले होते. माझ्या सुदैवाने विनोबाजी माझ्या मदतीला धावले. त्यांचे मौन संपल्यानंतर त्यांनी आचार्य लोकांनी आणीबाणीचे मूल्यमापन करावे असे सांगितले. 'आचार्य' याची व्याख्याही त्यांनी सांगून टाकली, 'जो निष्पक्ष, निर्वैर, निर्भय असेल तो आचार्य' अशी ती व्याख्या होती. भारतातील पंचवीस-तीस 'आचार्यां'चे संमेलन आणीबाणीचा विचार करण्यासाठी पवनार येथे आयोजित केले गेले. (आम्ही — निदान मी — निर्भय नव्हतो ही गोष्ट तर उघडच होती. कारण एरवी आणीबाणीविषयी आपली मते जाहीरपणे सांगण्यासाठी आम्हांला विनोबाजींच्या कृपा-कवचाची आवश्यकता वाटली नसती. असो.)

'आचार्य' म्हणून या संमेलनाचे मला आमंत्रण आले आणि घरात माझी प्रतिमा थोडीशी उजळली.

आचार्य संमेलनाचे एक सर्वसंमत निवेदन तयार केले. जयप्रकाशजी प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे त्यावेळी, मुंबईला आपल्या बंधूंकडे राहात होते. मी व संमेलनात सहभागी झालेले मुंबई विद्यापीठातील डॉ. पी.आर. ब्रह्मानंद यांनी ते निवेदन जयप्रकाशजींना नेऊन दिले. त्यांनी ते वाचून पाहिले व आपल्याला ते पूर्ण मान्य असल्याचे सांगितले. Fundamental Rights बरोबर Fundamental Duties चाही आपण आग्रह धरला पाहिजे, हा माझा विचार संमेलनाने तत्काळ मान्य केला होता व त्याचा समावेश निवेदनात होता. निघताना त्या रुग्णावस्थेतही आम्हांला निरोप देण्यासाठी ते बिछान्यावरून उठले आणि म्हणाले : "I am happy that you intellectuals have now started taking interest in the affairs of the country" या उद्‌गारात कौतुक आणि विषण्णता याचे मिश्रण मला जाणवले.

जयप्रकाशजींना हे निवेदन पूर्णपणे मान्य आहे असे इंदिराजींना कळविण्याची व्यवस्था मी केली.

इंदिराजींनी काहीही प्रतिसाद दिला नाही. परंतु घटनेत Fundamental Dutiesचा समावेश त्यांनी आपल्या कल्पने-प्रमाणे करून घेतला.

---

तळटीपा :

१. ही बैठक सकाळी झाली. संध्याकाळी विदर्भातील दोन कार्यकर्ते भेटले. ते विनोबाजींना नुकतेच भेटून आले होते. ते म्हणाले, "आम्ही विनोबाजींना सांगितले की, भूदानासाठी आम्ही आमचा जिल्हा दोनदा पिंजून काढला आहे"; तर विनोबा म्हणाले, "अरे, असे करून कसे चालेल? असे तुम्ही लोकांच्या मागे लागाल तर तुम्ही आलात की 'भूत' आले असे समजून लोक घाबरून पळत सुटतील. लोकांची इतरही विधायक कामे करत गेले पाहिजे. तुकाराममहाराज पंढरीला निघाले म्हणजे शेजाऱ्या-पाजाऱ्यांना विचारत, 'मी पंढरीला चाललो आहे तेव्हा तुमच्यासाठी काय आणू?' "

ते कार्यकर्ते सांगत होते, "तुकारामाचे नाव घेतले आणि विनोबांच्या डोळ्यातून घळाघळा अश्रू आले."

मी मनात चक्रावलो. सकाळचे विनोबा खरे, की आताचे? की दोन्हीही?

'साहे ओझे त्यास तेचि द्यावे' याचा हा वस्तुपाठ होता.

२. शिखरे वैद्य हे एक सात्त्विक उत्कट व्यक्तिमत्त्व होते. त्यांचे माझे संबंधही आपुलकीचे-जिव्हाळ्याचे होते. एकदा ते मला म्हणाले, "असं वाटतं की, जंगलात, दऱ्याखोऱ्यात काम करता करता मरण यावे आणि आपली हाडे कोल्ह्याकुत्र्यांनी खावीत."

मी मिस्किलपणे म्हटले, "तुमचं ठीक आहे हो. पण कोल्ह्या-कुत्र्यांचे काय?" ते खळाळून हसले.

असे हे शिखरे पुण्यात माझ्याकडे भर उन्हाळ्यात भर दुपारी आले. (माझी बदली पुण्याला झाली होती.) केवळ एक पंचा. अंगावर वस्त्र उपरणे. डोक्यावर काही नाही.

मला म्हणाले, "तुम्हांला भेटायला आलो आहे. बरोबर पन्नास हजारांची इंदिरा सर्टिफिकेट्स आणली आहेत. पाच वर्षांनी ही रक्कम एक लाख होईल. तुमच्याकडे ठेवा व तुम्हांला वाटतील त्या गोष्टींसाठी विनियोग करा. माझी काहीही अपेक्षा नाही."

मी त्यांना म्हटले, "मी तर तुमच्या पैशाला स्पर्श करणार नाही. परंतु तुम्हांला कशात रस आहे?"




अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संस्कृतमध्येही त्यांना रस होता. मी लगेच डॉ. रा.ना. दांडेकरांना फोन केला. दुसऱ्या दिवशी शिखरेंनी त्यांची भेट घेऊन भांडारकर प्राच्यविद्या संस्थेला ती देणगी दिली. पुढे डॉ. दांडेकरांनी एक छोटेखानी समारंभ केला. थोडी परंतु निवडक मंडळी हजर होती. नानासाहेब गोरे होते. आप्पासाहेब पंत होते. डॉ. दांडेकरांनी मला दोन शब्द बोलण्यास सांगितले. मी त्यावेळी आणखी सांगितले,

"शिखरे हे पैसे घेऊन माझ्याकडे आले तेव्हा ते म्हणाले, 'तुम्हांला वाटेल की हे पैसे मी कुठून आणले. स्वातंत्र्यसैनिक म्हणून मला मानधन मिळतं. मी विचार केला की, या मानधनावर आपला काय हक्क आहे? ती ही साठलेली रक्कम आहे.' "

जयप्रकाशजी सांगलीला शिखरे वैद्यांच्या उत्साही आमंत्रणामुळे आले. अचानक आदल्याच दिवशी शिखरेंना पाठीत काही झाले आणि त्यांना सर्व दिवस बिछान्यातच पडून राहावे लागले. जयप्रकाशजी स्वतः शिखरेंच्या दीडखणी घरी त्यांना भेटावयास गेले. तो प्रसंग हृद्य होता. शिखरेंना तर साहजिकच कृतकृत्यतेचा आनंद वाटला.

●●

---

## लेखक-परिचय

❖ **शरद् पाटील** : प्राचीन कालापासून आजपावेतोच्या भारतीय समाजाच्या इतिहास-संस्कृती-समाजव्यवस्था-परंपरा यांचा गाढ व्यासंग; सत्यशोधक कम्युनिस्ट पक्षाचे संस्थापक आणि मार्क्स-फुले-आंबेडकरवादाचे महनीय प्रवक्ते; *सत्यशोधक मार्क्सवादी* मासिकाचे संपादन (१९८२-९३); *दास-शूद्रांची गुलामगिरी,* खंड १ (भाग १ व २), *जातिव्यवस्थाक सामंती सेवकत्व, अब्राह्मणी साहित्याचे सौंदर्यशास्त्र*, इत्यादी ग्रंथांचे कर्ते. **पत्ता** : 'असंतोष', वाडी-भोकर रस्ता, धुळे ४२४ ००२.

❖ **रा.ग. जाधव** : मराठीचे माजी प्राध्यापक; मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे अध्यक्ष आणि प्रमुख संपादक; *साहित्य व सामाजिक संघर्ष, निळी पहाट, साठोत्तरी मराठी कविता व कवी, पर्यावरणीय प्रबोधन व साहित्य* इत्यादी समीक्षापर तीस पुस्तके प्रकाशित. **पत्ता** : ११८० सदाशिव पेठ, अनपट वाडा, पुणे ४११ ०३०.

❖ **दिलीप धोंडगे** : सटाणा (जि. नाशिक) येथील कर्मवीर आबासाहेब सोनवणे, महाविद्यालयात गेली १५ वर्षे मराठी विषयाचे अध्यापन. विविध नियतकालिकातून सातत्याने समीक्षात्मक लेखन प्रसिद्ध. *शैली मीमांसा* (२००१) हा ग्रंथ नुकताच प्रसिद्ध. भाषा विज्ञान हा आस्थाविषय. **पत्ता** : 'कल्पलता', पं.ध. पाटीलनगर, सटाणा (जि. नाशिक) ४२३ ३०१.

❖ **दे.अ. दाभोलकर** : अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक; आर्थिक विकास, गांधी विचार, शिक्षण, समाज परिवर्तन इत्यादी विषयांवर मौलिक चिंतन; भूतपूर्व कुलगुरू, पुणे विद्यापीठ व भूतपूर्व संचालक, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन, पुणे, *आर्थिक विकासाचा प्रश्न, लोकशाही समाजवाद, शिक्षणाची समान संधी* इत्यादी पुस्तिका व नियतकालिकांमधून अनेकविध विषयांवर लेखन; क्रियाशील विचारवंत; **पत्ता** : ४३ गुरुकृपा हाऊसिंग सोसायटी, गोडोली, सातारा.

---

ऑगस्ट अंकातील लेखक श्री. जी.के. ऐनापुरे यांचा परिचय –

❖ **जी.के. ऐनापुरे** : वसंतरावदादा पाटील महाविद्यालय कवठे महांकाळ (सांगली) येथे प्राणीशास्त्र विषयाचे प्राध्यापक. डाव्या चळवळीत काहीकाळ सहभाग. मराठीतील अग्रगन्य वाङ्मयीन मासिकांतून कथा-दीर्घकथा-समीक्षा प्रसिद्ध. *सर्पसावल्या* (कथासंग्रह), *अवकाश* (कादंबरी) पुस्तके प्रसिद्ध. **पत्ता** : ३० 'कृष्णाजी' रघुवंश सोसायटी, रेल्वेपुला पलिकडे, विजयनगर (पूर्व), वानलेस वाडी, सांगली ४१६ ४१४.

●●

अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

**संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने**

सुधारित किंमत : १ एप्रिल १९९७ पासून लागू

| पुस्तक | किंमत |
|---|---|
| वैदिक संस्कृतीचा विकास । (तिसरी आवृत्ती) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २७० रु. |
| पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | ६० रु. |
| हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | ५ रु. |
| श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदनग्रंथ | ६० रु. |
| संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ४० रु. |
| ज्ञानदेव चिंतन (संपादित) । डॉ. वसंत स. जोशी | ४० रु. |
| तरंगयामिक व पुंजयामिक । मा.ग. टोळे | १० रु. |
| आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | ८० रु. |
| वागीश्वरी । डॉ. गो.के. भट | ४० रु. |
| प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं.वा. लेले | २५ रु. |
| गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | १० रु. |
| इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद् पाटील | १०० रु. |
| शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १०५ रु. |
| तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प.ल. वैद्य | ३० रु. |
| हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन । मे.पुं. रेगे | २५ रु. |
| पाच पुस्तक-परिक्षणे । वा.म. कुलकर्णी | ४० रु. |
| भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | २० रु. |
| कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य । रा.भा. पाटणकर | ८० रु. |
| न्या. महादेव गोविंद रानडे : व्यक्तित्व, विचार व कार्य | १०० रु. |
| धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. बेडेकर | १५ रु. |
| आचार्य शं.द. जावडेकर : व्यक्तित्व आणि विचार | १०० रु. |
| तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| इहवाद आणि सर्वधर्म समभाव । मे.पुं. रेगे | ८० रु. |
| प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती । म.अ. मेहेंदळे | ५५० रु. |

*१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही. ३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.*

*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**


हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी [illegible] तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई